# चंपानाटक

किंवा

## नरगुंदकर व टिपूसुलतान यांची लढाई.

हें पुस्तक


बळवंत रघुनाथ लिमये नरगुंदकर,

पोलीस इन्स्पेक्टर, जिल्हा धारवाड, यांनीं केलें.


व


मुंबईत,

" निर्णयसागर " छापखान्यांत छापविलें.

आवृत्ति पहिली.

प्रती एक हजार.

सन १८९१ इसवी.

(किंमत १२ आणे.)




॥ श्रीः ॥

ज्या वीर पुरुषाची तलवार पेशव्यांच्या सैन्याच्या
अघाडीवर चमकत असे व ज्यानें नरगुंदकर
संस्थानिकांस टिपूच्या बंधनांतून मुक्त
करण्याविषयीं व त्यांचें संस्थान त्यांस
परत मिळण्याविषयीं पेशव्यांच्या दर-
बारीं खटपट केली त्या परशुराम-
पंत भाऊ पटवर्धनांचे
घराण्यांतील
जमखंडी दौलतीचे हल्लींचे मालक श्रीमंत राजश्री
**रामचंद्रराव आप्पासाहेब पटवर्धन**
यांचे चरणीं पूर्वापार उपकारांचे
स्मारकादाखल हें लहानसें
पुस्तक अनन्यभावें
नजर केलें असे.

नम्र सेवक

बळवंत रघुनाथ लिमये.

# प्रस्तावना.

**अस्थिरं जीवितं लोके अस्थिरं धनयौवनम् ॥**
**अस्थिरं पुत्रदारं च धर्मः कीर्तिः स्थिरं द्वयम् ॥ १ ॥**

हें कोणा महान् पंडिताच्या तोंडचें वाक्य असून तदनुसार ज्या पुण्यवान् पुरुषांनीं धर्म आणि कीर्ति संपादिली अशांचीं नांवें ह्या जगांत अजरामर झालीं आहेत. दक्षिण महाराष्ट्र देशांत नरगुंद हें एक लहानसें संस्थान होतें. हें इसवी सन १८५८ सालीं संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकाराविरुद्ध बंड केल्यामुळें खालसा होऊन लयास गेलें, तथापि या संस्थानांतील पुरुषांनीं पूर्वकालापासून संपादिलेली कीर्ति कांहीं मावळली नाहीं. तेव्हां अशा पुरुषांचीं चरित्रें लिहून ठेवणें मला अवश्य वाटून माझ्या संग्रहीं असलेले जुने कागदपत्र सर्व एकत्र केले. या कागदपत्रांतील मजकुरावरून व वृद्ध लोकांनीं सांगितलेल्या गोष्टींवरून टिपू-सुलतानाशीं नरगुंदचे संस्थानिकांपैकीं एका पराक्रमी पुरुषानें केलेल्या लढाईच्या हकीगतीचें साग्र वर्णन मनांत आणतां संस्थानिक व त्यांचे कारभारी यांचें शौर्य, धैर्य, स्वधर्माभिमान व तो रक्षण करण्याची पद्धत, यवनास शरण जाणार नाहीं असा दृढनिश्चय, तशा निश्चयामुळें यवनांपासून त्यांचा झालेला छळ, संस्थानिक व त्यांच्या पदरच्या मंडळींत परस्पर सेव्यसेवकत्वाचें प्रेम, आणि तें प्रेम संकटसमयीं देखील राखण्याविषयीं परस्परांची दक्षता, इत्यादि गोष्टी फारच चित्तवेधक आहेत, असें वाटून, टिपू-सुलतानाशीं झालेली नरगुंदकरांची लढाई एवढाच भाग प्रथम नाटकरूपानें छापून प्रसिद्ध करावा असा निश्चय केला व त्याप्रमाणें हा माझा अल्प प्रयत्न महाराष्ट्र वाचकांसमोर ठेविला आहे.

पुस्तक लिहिण्याचें काम हल्लीं फार जोखमाचें झालें आहे; तशांत नाटकरूपानें लिहिणें हें तर विशेष कठिण आहे. नाटकांत व्यवहारांत घडून येणाऱ्या गोष्टींचें हुबेहुब चित्र दाखवावें लागतें, आणि तसें चित्र दाखविण्यास पात्रांचे तोंडीं समयास अनुसरून योग्य अशी वाक्यरचना, शब्दमाधुर्य, अर्थलालित्य इत्यादि गोष्टींची आवश्यकता लागते. शिवाय, सृष्टिकर्त्यांचे अव्याहत नियमांस व व्यवहारास अनुसरून चांगल्याचा परिणाम चांगला व वाईटाचा परिणाम वाईट कसा होतो याचेंही दिग्दर्शन करावें लागतें. हें सर्व या पुस्तकांत कितपत साधलें आहे, हें पाहण्याचें काम मी सुज्ञ व रसिक वाचकांवरच सोंपवितों.

हें पुस्तक छापण्याच्या संबंधानें निर्णयसागर छापखान्यांतील शास्त्रीलोकांनीं व छापखान्याचे मालक रा. रा. **जावजी दादाजी** यांनीं विशेष काळजी व श्रम घेतले याजबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

पुणें, कार्तिक शुद्ध १ शके १८१३.

**पुस्तककर्ता.**

# चंपानाटक.

## नाटकांतील पात्रें.

**व्यंकटरावसाहेब भावे**—नरगुंद संस्थानचे मालक.

**काळोपंत पेठे**—त्यांचे कारभारी.

**अमृतराव**—त्यांचे पदरचा सरदारपुत्र.

**चंपा**—त्यांच्या पदरच्या एका सरदाराची कन्या.

**कृष्णाजीपंत**—संस्थानांतील एक नवीन कारकून.

**वेणूबाई**—कृष्णाजीपंताची बायको.

**साळू**—चंपाची कुळंबीण ( दासी ).

**सटवाजी**—संस्थानिकांचा हुजऱ्या.

**तुळाजीराव माने**—यात्रा करीत हिंडणारा नागपूरचा एक सभ्य गृहस्थ.

**विठू**—तुळाजीराव माने यांचा चाकर.

**भोपे**—तुळजापूर एथील श्रीभवानीचे पुजारी.

**ब्राह्मण**—तुळजापूर एथील क्षेत्रस्थ ब्राह्मण.

**टिपूसुलतान**—ह्मैसूरच्या राजास पदच्युत करून तें राज्य बळकाविलेल्या हैदरखानाचा मुलगा.

**मीरसादक**—टिपूसुलतानाचा वजीर.

**बदरी जमालखा**—टिपूसुलतानाचा सरदार.

**मुकुंदराव**—टिपूसुलतानानें नरगुंदकरांकडे मध्यस्थीस पाठविलेला वकील.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—उत्तरेकडील बाजूस स्वाऱ्या करणारा टिपूसुलतानाचा सरदार.

**सय्यद गफूर**—सय्यद बुऱ्हानुद्दिन याचे हाताखालचा सरदार.

**जमालखा**—सय्यद बुऱ्हानुद्दिन याचे लष्करांतील एक नोकर.

**नाना फडणीस**—पेशव्यांच्या दरबारांतील मुख्य कारभारी.

**हरिपंत फडके**—पेशव्यांच्या हुजुरांतील फौजेचा सेनापति.

**परशुरामपंत भाऊ**—पेशव्यांच्या सरदारांपैकीं पटवर्धन घराण्यांतील सुप्रसिद्ध सरदार.

---

# चंपानाटक.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

स्थल—नरगुंद येथील व्यंकटेशाचे देवालयाच्या प्राकारांतील ओरी.

( मुकुंदराव प्रवेश करितो. )

**मुकुंदराव**—( आपल्याशींच ) मला या नरगुंदास येऊन एक महिना झाला. अद्याप आल्या कामाचा भाग तुटेना. कारभारी काळोपंत पेठे कांहीं केल्या ताळ्यावर येत नाहीं. आपली योग्यता आणि शक्ति यांकडे न पाहतां "मी टिपूसुलतान याचा धनीपणा कबूल करणार नाहीं! खंडणी देणार नाहीं! प्रसंग आल्यास लढाई करण्यास तयार आहें!" असें धाडसाचें बोलणें बोलतो; या बोलण्यास काय ह्मणावें? सांप्रत पेशवे, निजाम अशांस देखील हा टिपू भारी झाला आहे; मग या लहानशा संस्थानिकाचा तो पाड काय? मुकाट्यानें टिपूचें स्वामित्व कबूल करून खंडणी द्यावी; यांतच याचें शहाणपण! नाहींपेक्षां, टिपूनें राज्याभिलाषरूपी पसरलेल्या जबड्यांत हें ब्राह्मणी संस्थान पडून गिळंकृत होणार हें खचित. तेव्हां या थरास गोष्ट न यावी अशाबद्दल माझी खटपट चालू आहे. परंतु, या कारभाऱ्याच्या हेकडपणामुळें बिलकुल

इलाज चालत नाहीं. (देवळाकडे पाहून पूज्य बुद्धीनें) अहाहा! सोनेरी कळसानें सुशोभित हें पंचगोपुरी व्यंकटेशाचें देवालय कसें भव्य आणि रमणीय दिसत आहे! पाहा, ही प्रातःकाळची पूजा चालली असून पुराणीक, वेदपारायणी, गायक, नृत्य करणाऱ्या नायकिणी, रुद्रवीणादितंतुवाद्यवाले, स्तुतिपाठक, भाट, डवरी, गोसावी हे सर्व सेवेकरी सेवा करण्यास कसे वेळ चुकल्यास शासन होईल या भीतीनें लगबगीनें येत आहेत. कारण ही सांजसकाळची सेवा नेमल्यावेळीं झालीच पाहिजे, असा इकडचा नियम ठरून गेला आहे. शुक्रवारच्या शुक्रवारीं होणाऱ्या नुसत्या पालखीच्या सेवेचा थाट पाहून मी इतका थक्क झालों आहें. मग हजारों रुपये खर्चून आगमोक्तविधीनें नवरात्रउत्साह व तत्संबंधीं अन्नसंतर्पण हीं होतात, तीं पाहणाराचे मनास किती आनंद होत असेल बरें? एकंदरींत हें स्थान पाहिलें ह्मणजे श्रीव्यंकटगिरीस भूवैकुंठ ह्मणतात, त्याचीच साक्ष निःसंशय येथें आहे. शाबास! धन्य माझी! येथें या देवस्थानांत उतरल्यानें, सर्वदा देवालयाच्या वेदशास्त्रपाठशाळेंतील विद्यार्थ्यांच्या तोंडानें चाललेला वेदघोष व शास्त्राची चर्चा ऐकून, आजपर्यंत त्या यवनाचे दरबारीं संसर्गानें विटाळलेला हा माझा देह पवित्र होत आहे! मी प्रत्यहीं पाहतों, दोन घटका दिवस चढतो न चढतो इतक्यांत गांवांतील मंडळी स्नानें आटपून देवदर्शनास आल्यावांचून कोणीही राहत नाहीं. कोण भक्ति ही! या नरगुंदांत नुसतीं तीनचारशें ब्राह्मणांचीं घरें आणि येथें अकरा अग्निहोत्रें! आणि त्यांचा सर्व खर्च संस्थानांतून चाललेला! धन्य या संस्थानिकांची!

अभ्यागतांकरितां ठेविलेलें सदावर्त व अन्नछत्र यांत येणाऱ्या पांथस्थांची व वेदशास्त्रशाळेंतील विद्यार्थ्यांची जेवणाखाणाची व्यवस्था इतकी उत्तम ठेविली आहे कीं, असा बेत चांगल्या टापटिपेच्या गृहस्थाचे घरीं सुद्धां नसेल. या संस्थानीं येणाऱ्या बाहेरगांवच्या विद्वज्जनांस त्यांच्या विद्वत्तेस अनुरूप अशा सत्काराचा धडाका नित्यशः चालला आहे ह्मणूनच संस्थानिकांच्या औदार्याची ख्याति चोहोंकडे पसरली आहे हें ठीकच आहे. खेरीज, गांवांतील लहान भिक्षुकापासून मोठ्या पंडितापर्यंत प्रापंचिक निर्वाह कसा चालेल असा दैन्यतेचा शब्द मी येथें आल्यापासून एकाचेही तोंडीं न ऐकतां सर्वत्र आपापल्या विद्याव्यासंगांत सदा निमग्न असल्याचें पाहत आहें. ह्मणूनच या संस्थानांत दशग्रंथी वैदिक, चतुःशास्त्री पंडित, सिद्धांतज्योतिषी तयार होत आहेत व झाले आहेत. मग हें विद्यापीठ कां न ह्मणावें? जसें हें ब्रह्मकर्म अव्याहत चाललें आहे, त्याप्रमाणेंच रयत, व्यापारी, महाजन यांना कोणत्याही तऱ्हेची सरकारी तोशीस नसल्यानें स्थळमोड व स्थलभर्तीची ही दांडगी पेंठ होऊन येथें एवढाले धनाढ्य सावकार झाले आहेत. यावरून या संस्थानिकास व्यवहारचातुर्यनिपुण ह्मणण्यास काय बाध आहे? शिवाय दुसरें असें कीं, मानकरी, शिलेदार, कारकून, मुत्सद्दी, व इतर लहानसान चाकर, या सर्व पदरच्या मंडळीस वेतनें अव्याहत चाललीं असल्यामुळें ते सर्व संस्थानचे पिढीजाद चाकर होऊन धन्याच्या आणि चाकराच्या दरम्यान सेव्यसेवकत्वाचें प्रेम जडून गेल्या कारणानेंच या संस्थानिकांस टिपूशीं सामना करण्याची हुरूप आली

असेल काय ? (जरा विचार करून गंभीर मुद्रेनें) यथार्थच आहे ! शक्ति जरी कमी असली तरी प्रेमामुळें एकोपा होऊन धैर्य वाढतें. आणि तशा धैर्यांत एकवटलेलीं शंभर माणसें आपण हजारांस भारी आहों अशी उमेद बाळगण्यास निःसंशय समर्थ होतात ! एकंदरींत या लहानशा संस्थानांतील राज्यव्यवस्था जशी वाखाणण्यास योग्य आहे, तशी मोठाल्या राजधानींत सुद्धां नसेल. या भावे कुळांतील ज्या पुण्यपुरुषानें हा राजनीतीचा मूळपाया घातला त्या महानुभावाची धन्य ! त्या पुरुषाची शाबास ! ! त्याची तारिफ करावी तितकी थोडी आहे. (वर किल्ल्याकडे पाहत) वाः ! पाहा हा गड ! कशी याची पगड ! या नरगुंदाकडे येतांना बऱ्याच पल्ल्यावरून हा डोंगर, जसा एखादा सिंह घोर अरण्यांत सावजावर लक्ष ठेवून झडप घालण्याच्या इराद्यानें पंजे सरसावून, डोळ्यांचीं बुबुळें फिरवीत, छाती पुढें करून, उड्डाण करण्याचे तयारींत टपून राहिला असतो, तसा या अफाट चार कोसांच्या काळ्या सपाट मैदानांत हा एक कोसाचे परिघाचा कांहींसा लांबट, आणि उन्नत डोंगर[1], चौफेर भक्कम तटबंदीच्या बुर्जांवरून

---

१ हा डोंगर सह्याद्री पर्वताची मालिका जी दक्षिण महाराष्ट्र प्रांतांत गेली आहे तिच्या फाट्यांपैकीं एक भाग मालिकेपासून अलग तुटलेला नैर्ऋत्येकडून आग्नेय दिशेस वरोळ्याच्या (पैमाष खात्यांतून जमिनीच्या खुणा समजण्यास बांध किंवा वरोळ्या घालतात) आकृतीसारखा जरी आहे तथापि नैर्ऋत्येकडील भागापेक्षां आग्नेय दिशेकडील भाग उंच असून डोक्यावर विस्तृत आहे. त्या बाजूवरच किल्ला बांधलेला आहे. या डोंगराची उंची जमिनीच्या सपाटीपासून अजमासें आठशें फूट आहे.

जागोजाग तोफा रोंखून सज्ज केलेल्या किल्ल्यासहित, वीरश्रीयुक्त शत्रूवर तुटून पडण्याच्या तयारीनेंच राहिला आहे कीं काय असा भासतो. किंवा हा कोणी भीमासारखा बलाढ्य मल्ल दंड थोपटून, मांडीवर थाप मारून, मान व छातीचा भाग पुढें झुकता ठेवून, कुंस्ती करण्याच्या ऐटीनें उभा आहे कीं काय असा दिसतो. यावरून मला वाटतें शिवछत्रपतिमहाराजांनीं या किल्ल्यास महामत्तगड[1] असें दिलेलें नांव अन्वर्थ आहे! प्रथम, हा अशा प्रकारचा किल्ला व नंतर त्याचे पायथ्याशीं असलेलीं सुंदर देवालयांचीं शिखरें, व त्यासभोंवतालचा देवालयाचे प्राकाराचा तट, आणि त्यास लागून संस्थानिकांचा वाडा, वाड्यास लागून ब्रह्मपुरी व त्यांतील देवालयें, आणि त्याखालीं गांवची इतर वस्ती हीं सर्व एका मागून एक दृष्टिगोचर होत गेलीं ह्मणजे, हें केवळ स्वधर्मनिष्ठजनांचें वसतिस्थान होय असें वाटतें. (साश्चर्य) यांत चमत्कार हा कीं, किल्ल्याचा आणि त्याखालील असे दोन्ही देखावे एकसमयावच्छेदेंकरून प्रेक्षकाचे नजरेस येण्याबरोबर, निग्रहानुग्रहसमर्थ जे श्रीव्यंकटपति प्रभु त्यांचें माहात्म्य या ठिकाणीं व्यक्त होत आहे असें मनांत आल्यावांचून राहत नाहीं! (खेदयुक्त मुद्रेनें) आतां माझ्या

---

१ श्रीमन्महाराज शिवाजी राजे छत्रपति यांचे आज्ञेवरून हा किल्ला बांधण्यास आरंभ केला. याचें काम शके १५९६ आनंदनाम संवत्सर या सालीं पुरें झालें. यावरून यापूर्वींच कांहीं दिवस कामगारी सुरू असावी असें वाटतें. या किल्ल्यास महामत्तगड हें नांव महाराजांचे आज्ञेवरून दिल्याबद्दल वगैरे दाखला जुन्या कागदपत्रांत आढळतो.

सामदामाच्या गोष्टी न ऐकतां हे संस्थानिक टिपूचे सैन्याशीं सामना करण्यास उभे राहतील, आणि जरी यांची शिबंदी, तोफखाना, पागा, किल्ल्यावरील तयारी चांगली आहे तरी, टिपूच्या प्रचंड व बलाढ्य सैन्यापुढें एक क्षण सुद्धां यांचा टिकाव न लागतां पराजय पावून, या ब्राह्मणी संस्थानाचा फडशा उडेल व यांतील व्यवस्थेचा चुराडा होऊन सर्व ब्रह्मकर्माचा लोप होईल, आणि हल्लीं येथें जें ऐश्वर्य दिसत आहे याचा सत्यनाश झालेला दृष्टीस पडणार! किती बरें खेदकर हा प्रसंग! शिव शिव!! याची कल्पना सुद्धां करवत नाहीं! आतां करावें तरी काय? मी जरी त्या यवनाचा चाकर आहें तरी, (जानवें आंगठ्यावर घेऊन) या यज्ञोपवीताच्या अभिमानामुळें इतकें मला वाईट वाटत आहे. शेवटची युक्ति राहिली आहे तेवढी करून पाहावी. काल कृष्णाजीपंतांनीं संस्थानिक व्यंकटरावसाहेब यांची भेट करवितों असें सांगितलें आहे. तर खाशांस भेटून, त्यांस चार समजुतीच्या गोष्टी सांगून पाहाव्या. खासे व्यंकटरावसाहेब तर लहान मूल, केवळ बावीस तेवीस वर्षांचें वय, अद्याप कशाचा अनुभव नाहीं, व अशा राजकारणप्रसंगीं तोडजोड करण्याची अजून त्यांस योग्यता आली नाहीं, यामुळें त्या कारभाऱ्याचें इतकें वर्चस्व वाढलें आहे. तथापि त्यांच्या वागणुकीवरून ते शहाणे आणि चतुर दिसतात. तेव्हां माझ्या सांगण्यानें ते कांहीं तरी आपल्या हिताचा विचार करतील. हा उपाय साधल्यास संस्थान बचावल्याचें श्रेय येऊन, शिवाय सांगितलेली कामगिरी बजावल्याची माझी तारीफ सुलतानबहादराकडे

होणार आहे. ( पलीकडे पाहून ) ठीक ठीक, काम झालें. कृष्णाजीपंत बोलल्याप्रमाणें इकडेसच येत आहेत. ( कृष्णाजीपंत प्रवेश करितो. ) यावें पंत, नमस्कार, या बसा. ( दोघे बसतात. ) पंत, कसें काय ? आज खाशांचे भेटीस जावयाचें ना ?

**कृष्णाजीपंत**—होय जायचें तर ? आपण भेटीस येणार ही गोष्ट मीं यजमानांच्या कानावर घातली. ( एकीकडे ) झोकावी एक गप्प. ( उघड ) आपली त्यांची एकांतीं गांठ घालण्याची पराकाष्ठा केली, पण तसा योग येत नाहीं. यजमानांच्या मनांतून काळोपंतआप्पांच्या समक्ष आपली भेट घ्यावी असें आहे.

**मुकुंदराव**—मर्जी त्यांची, तसें का होईना ? सर्व गोष्टींचा उलगडा आप्पांच्या आणि खाशांच्या समक्षा-समक्ष होऊन जाऊं दे ! कृष्णाजीपंत, आपण शहाणे, चतुर असें जाणून मुद्दाम आप्पांनीं आपल्यास पुण्याहून आण-वून दरबारीं बाळगले आहेत; तर आपण तरी पाहा कीं, आमचें ह्मणणें सयुक्तिक का आप्पांचें ? आपल्यास सर्व मजकूर कळलेलाच आहे.

**कृष्णाजीपंत**—( एकीकडे ) इथें यांच्यासारखेंच बो-लावें. ( उघड ) आपलें ह्मणणें सयुक्तिक असें कोणीही ह्मणेल ! आप्पांचा या कामीं शुद्ध हेकडपणा आहे. मी त्यांचे मर्जींतला ह्मणून तोंडदेखणें बोलणारा नव्हें. टिपूशीं वैर करणें हें केवळ पतंगानें दिव्यावर झडप घालण्यासारखें होणार आहे !

**मुकुंदराव**—अगदीं खरें बोललांत.

**कृष्णाजीपंत**—पण अहो, आप्पांस सांगावें कुणी ? आह्मी पडलों ताबेदार ! बरें तर, आतां मी देवदर्शन घेऊन वाड्यांत जातों. खाशांची स्वारी शिकारीहून येतांच आपल्यास दरबारची वेळ समजून घेऊन सूचना पाठवीन, त्या बेतानें यावें.

**मुकुंदराव**—ठीक आहे. चला मीही देवदर्शनास येतों.

( दोघेही जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

**स्थल**—तांबड्या वेशीबाहेरील बाग.

( व्यंकटरावसाहेब व त्यांचा सोबती सरदारपुत्र अमृतराव प्रवेश करितात. )

**अमृतराव**—महाराज, आज ही हिरकणी घोडी होती ह्मणूनच तिनें त्या हरणाची लगट केली. सरकारांनीं अशा तारिफीनें बर्ची मारली कीं, घोडीनें लगट करून पुन्हा उलट घेतल्यासरशीं बर्चीबरोबर हरण लोळतच आला !

**व्यंकटराव**—आजच्यापेक्षां सूर्यबनाच्या बारींतील परवांच्या शिकारीची मजा खरी. चला आपण आतां बागेंत जाऊन वनभोजनाच्या मंडपाची तयारी कशी काय चालली आहे ती पाहूं. यंदां नेहमींपेक्षां मंडप वाढवून डेरे, राहुट्या यांकरितां चांगली जागा तयार करविणार आहों.

**अमृतराव**—यंदां विशेषशी तयारी दिसते ?

**व्यंकटराव**—एरव्हींच. ह्मणण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. आपल्या चंपाताईचें उद्यां मार्गशीर्षांत लग्न होणार,

हें सगळें खरें, परंतु माझ्या मनांतून मुख्य मुलगा चांगला असावा हें पाहणें आहे. नाहीं तर " बडे बापके बेटे " या म्हणीप्रमाणें बापाच्या नांवावर विकणाऱ्या एखाद्याच्या गळ्यांत हिला कांहीं नेऊन बांधायाची नाहीं! मुलगा सुशील, शहाणा, शूर असा असला पाहिजे, व हेंच मीं आईसाहेबांना आणि काळोपंतआप्पांना सांगून ठेविलें आहे.

**अमृतराव**—ते देखील तसेंच स्थळ पाहून ठरवितील, महाराज.

**व्यंकटराव**—उघडच आहे, आईसाहेब नुसत्या जहागिरीवरच नाहीं लक्ष द्यायच्या.

**अमृतराव**—रणदिव्यांच्या घराण्यांत पुत्रसंतति नसल्यानें पुढें त्यांचें नांव कसें राहील? हे काकुळतीचे उद्गार सरकारच्या तोंडांतून नुक्तेच निघालेले ऐकून, माझ्या अंतःकरणास कसा चटका लागून राहिला आहे. अहाहा! पदरच्या माणसांची येवढी कळकळ बाळगणाऱ्या धन्याची सेवा करणारे आह्मी या दुनयेंत खरोखर धन्य आहोंत!

**व्यंकटराव**—अमृतराव, कळकळ बाळगण्यांत नवल तें काय? अहो तुमचें रणशिंग घराणें, शिवाय रणदिवे, जगताप, भोसले, मर्दानसिंग, हैसकर, खेरीज इतर मानकऱ्यांच्या घराण्यांतील पराक्रमी पुरुषांनीं आणिबाणीच्या वेळीं आपले जीव बळी देऊन मर्दुमकी गाजविली ह्मणूनच या आमच्या **भावे** घराण्यास महाराज छत्रपति यांजकडून हें संस्थान, हें ऐश्वर्य, आणि घटप्रभेपासून तुंगभद्रेपर्यंत अमलाचा अधिकार मिळाला आहे! शिवाय हा नरगुंदचा महामत्तगड आणि रामदुर्गचा महिपतगड हे दोन्ही किल्ले मोंगलांनीं बळकाविले होते ते त्यांजकडून परत घे-

तांना या शूरांनीं कसें शौर्य गाजविलें त्याची साक्ष बतेरीच्या चौकीवर फडकणारीं हल्लयांत हिरावून घेतलेलीं हिरवीं निशाणें अद्याप देत आहेत ! पाहा, तुह्मीं मिळवून दिलेल्या सुखाचा अनुभव आह्मी एकसारखा आनंदानें घेत असूनही जर तुमच्या सुखदु:खाचे वांटेकरी न झालों तर आमच्याकडे कृतघ्नपणाचा दोष येणार नाहीं काय ?

**अमृतराव**—(स्फुरण आलेंसें करून) महाराज, हें भाषण ऐकून माझ्या आंगरख्याचे बंद कसे तटातट तुटत आहेत !

**व्यंकटराव**—अमृतराव, या बोलण्याच्या नादांत पाहा मी विसरलों—चंपानें मला आज सकाळींच भेटीस बोलाविलें होतें, परंतु आतां उशीर झाला; स्नानाची वेळ झाली, जेवण होण्याबरोबर येईन ह्मणून माझा निरोप वाड्यांत जातांच तुह्मी तिला जाऊन कळवा.

**अमृतराव**—आज्ञा, सरकार.

**व्यंकटराव**—चला, आपण बागेंतील तयारी पाहून वाड्यांत जाऊं.

**अमृतराव**—चलावें महाराज. (दोघे जातात.)

---

## प्रवेश तिसरा.

### स्थल—चंपाचा महाल.

**चंपा**—( तसबिरी पाहत आपल्याशींच ) आतां मात्र तसबीर कशी छान खुलून दिसूं लागली आहे. हा मंदील, हा नेहमींचा पोषाख, आणि हें हुबेहूब रूप यावरून ही पुरुषाची तसबीर कुणाची, हें दादांच्या लक्षांत तेव्हांच

येईल. त्या मोहित्यांकडील मनुष्यास आईसाहेबांनीं अ-द्याप वचन दिलें नाहीं. एकदां वचन देऊन चुकल्यावर तें मोडण्यास सगळ्यांनाच जड जाणार! तेव्हां, ही संधी दवडतां कामास नये. तोंडानें सांगत बसण्यापेक्षां, हातानें करून दाखविणें बरें; आपलें मनोगत लाजेनें लपवून ठे-वण्यापेक्षां घट्ट धैर्य धरून दादांच्या हातीं ही तसबीर द्यावीच. हें जोडपें पाहिल्याबरोबर, माझ्या मनांतील हेतु दादांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहींत. मला नाहीं वाटत दादा माझ्या इच्छेविरुद्ध जातील असें. हें सगळें खरें, पण बाई तिकडचें मन कसें आहे हें कुणी ओळ-खावें? नको आतां उगीच हजार शंका मनांत आणा-याला! देवाचें नांव घेऊन आपण आपला यत्न करावा. प्रयत्नीं परमेश्वर! मी तरी काय करूं? ते गुण, तें रूप पाहून जिवाला कसा चटका लागून गेला आहे! रात्रंदि-वस डोळ्यांपुढें मूर्ति उभी राहिलेली दिसते! सरदारी पोषाखानें कंबरेला तलवार लावून दादांबरोबर जेव्हां स्वारी माझ्या महालांत येते, तेव्हां त्या गंभीर आणि भव्य चेहऱ्याकडे एकाएकीं पाहवत नाहीं खरें, पण चटदिशीं जाऊन कंबरेला मिठी मारावी असें अंतःकरणांत प्रेम उ-त्पन्न होतें! नांव तरी कसें गोड! अमृतराव! ठीकच आहे! आज कितीएक दिवस अशा विरहानें आशाबद्ध होऊन झुरणीस लागलेला हा देह अमृतप्राप्तीवांचून कसा बरें जगावा? दादा येण्याची वेळ होत आली. आतां लौकर आंग धुऊन वाट पाहत बसावें.

(चंपा आंत जाते.)

---

## प्रवेश चवथा.

**स्थल**—चंपाचे महालापुढील देवडी.

( अमृतराव प्रवेश करितो. )

**अमृतराव**—( आपल्याशींच ) या चंपाचें लग्न झाल्यावर ही सासरीं जाईल, लौकर भेटायाची नाहीं, ह्मणून यजमानसाहेबांस बंधुत्वाच्या नात्यानें अवघड वाटतें तें ठीकच. पण मला त्यांच्यापेक्षांही जास्त वाटतें. नुसतें अवघड वाटून कोठें राहत आहे? तिचें लग्न होणार, व तिला मग दुसऱ्याची बायको ह्मणणार! हें ऐकल्यापासून तर मनाला इतकी कांहीं हुरहुर लागली आहे कीं, त्यामुळें आज पोटभर जेवण सुद्धां गेलें नाहीं. बरें आज पुष्कळ वर्षें आपण व ती एके ठिकाणीं वाढलों खेळलों, एवढ्यानेंच जिवाला असा हा चटका लागून राहिला आहे काय? छेः, नव्हे! तर? तिचें सौंदर्य, तिचें शहाणपण, तिचा प्रौढपणा, तिची सभ्य वागणूक, या सर्व तिच्या अमूल्य गुणांनीं माझें मन अगदीं वेडें होऊन, सदा सर्वदा असें वाटतें कीं, हीच आपल्यास बायको मिळावी! हिच्याशींच लग्न लागावें! बाबांनीं माझें लग्न करावें ह्मणून आजवर पुष्कळ मुली पाहिल्या. परंतु चंपावर मन बसल्यामुळें मी बाबांस कांहीं तरी निमित्तें सांगून वेळ टाळीत आलों, आणि वयाला तेवीस वर्षें झालीं असूनही अद्याप बायकोवांचून राहून, शेवटीं आरशांत दिसणाऱ्या संपत्तीवर जसें टक लावून बसावें, तद्वत या चंपावर आशा ठेवून बसल्यासारखें होणार ना? अहाहा!! या दुःखापुढें दुसरें दुःख तें काय? मग जेवण कसें गोड लागावें आणि मनाला चैन तरी कसें पडावें? (सुस्कारा

टाकीत खालीं बसतो.) बरें, ही चंपा मला प्राप्त व्हावी तरी कशी ? तिला श्रीमंतांनीं बाळगल्यामुळें ती खाशा मंडळींत मोडते. शिवाय आईसाहेबांचे मनांतून तिला एखाद्या मोठ्या जहागिरदाराकडे द्यावयाचें आहे, यावरून माझे मनांत उत्पन्न झालेली इच्छा चुकीची आहे असें कोणीही ह्मणेल. परंतु चूक तरी कशी ह्मणावी ? मी जसा मानकरी तशी ती देखील मानकऱ्याची मुलगी. खेरीज या रणदिवे घराण्याचा आमचे घराण्याशीं मागें शरीरसंबंधही झाला आहे. याकडे जर पाहिलें तर या चंपाविषयीं मीं इच्छा बाळगणें हें अयोग्य आहे, असें कोण ह्मणेल ? शिवाय, जसें माझ्या मनांत आहे, तसें तिच्याही मनांत असावें असें धोरण दिसतें. कारण तिची वागणूक आतांशा मजबरोबर अगदीं निराळ्या तऱ्हेची दिसते ! एकांतीं अवचित गांठ पडली ह्मणजे, ती नेहमीं मजबरोबर जसें बोलावें तसें न बोलतां खालीं मान करून उभी राहते ! सहजीं तिच्याशीं विनोद केला तर न रागावतां एके गालांत हंसून प्रफुल्लित मुद्रेनें मनाचा उल्हास दाखविते ! आणि लगेच बावरल्यासारखें करून लाजते ! अशांत तोंडावर आलेले घर्मबिंदु खालीं मान करून पदरानें पुशीत माझा डोळा चुकवून हळूच मजकडे पाहूं लागते ! व पुढें क्षणांत सुस्कारा टाकीत चालती होते !! ह्या तिच्या मनोवृत्तीच्या चळवळींवरून मीं मनांत केलेली अटकळ खरी कां नसावी ? बरें इतक्यावरूनच तिचें मन मजवर आहे असें ह्मणतां येईल काय ? कारण, आतां ती वयांत आली असल्यामुळें पुरुषाबरोबर बोलतांना लाजणें हें स्वाभाविक आहे तशी ती लाजत असेल. बाळपणापासून मैत्री असल्यानें माझे वि-

नोदप्रद भाषणाचा तिला कदाचित् रागही येत नसेल! अवचित् एकांतीं पुरुषांची भेट झाली ह्मणजे लज्जेनें बावरल्यासारखें करणें हा तरुण स्त्रियांचा आंगचा स्वभावच आहे, तसें तिलाही होत असेल यांत नवल तें काय? कांहीं असो! तिचें मन कसें आहे हें चांगलें ओळखल्यावांचून मनांत उगीच तर्क करीत बसण्यांत अर्थ नाहीं. मनाची पूर्वी खात्री करून घेऊन यत्न करून पाहावा. साधल्यास ठीकच, नाहीं तर बस्स "जोगी बन जायगे"! (उठून उभा राहतो.) तिचें मन ओळखण्याला ही संधी बरी आहे. कारण, हल्लीं तिचे लग्नाचें घाटत असलेलें तिला कळलेंच असेल? तेव्हां आपण हें बोलणें तिच्याशीं युक्तीनें काढावें. श्रीमंताचे घरीं आपण पडणार याचा तिला संतोष आहे किंवा कसें हें पाहूं! आतां आंत जावें. कोण आहे रे, पाहाऱ्यावर? (साळू कुळंबीण पुढें येते.) अग साळू, चंपाताईना सांग, यजमानांकडून मी कांहीं निरोप कळवायला आलों आहें.

**साळू**—(आंत जाऊन बाहेर येते.) यावं साहेब आंत, ताईसाहेब बलावत्याती. (अमृतरावास पाहतांच चंपा उठून उभी राहते.)

**चंपा**—या अमृतराव बसा. (उभयतां बसतात.)

**अमृतराव**—काय चाललें आहे?

**चंपा**—दादा इकडे येणार ह्मणून त्यांची वाट पाहत बसलें आहें.

**अमृतराव**—असें काय? पण सरकार आतां येत नाहींत, जेवण झाल्यावर येणार, असा निरोप आपल्यास कळविण्याकरितां मला आज्ञा झाली आहे.

**चंपा**—मला देखील वाटलं होतं—उशीर झाला, दादा आतां येणार नाहींत. पण ह्मटलं, जरा वाट पाहावी; आज दादा शिकारीस गेले होते ना ? तुह्मी असालच स्वारीबरोबर, मग कसली शिकार केलीत आज ?

**अमृतराव**—आज फारवेळ स्वारी रानांत राहिली नाहीं. टिपूकडील वकील आज तिसरे प्रहरीं भेटीस येणार आहे. शिवाय तुमच्या लग्नाचें ठरविण्यास कोणी आले आहेत, त्या संबंधानें त्यांच्याशीं बोलायाचें असल्यावरून, आज सरकारचें मन शिकारीवर नव्हतें. नुसता एक हरण मारला आणि लगेच स्वारी परतली.

**चंपा**—एकून, आज दादांचं मन शिकारीवर नव्हतं असं झालं ?

**अमृतराव**—दोन्ही कामें नाजूक आणि विचार करण्याजोगतीं. तेव्हां तिकडे लक्ष असल्यावर, दुसरीकडे लागायाचें नाहीं हें उघड आहे.

**चंपा**—एक तर ठीकच, दरबारी काम—वकिलाबरोबर बोलायचें, आणखी दुसरं कोणतं बरं तुह्मीं ह्मटलंत तें ?

**अमृतराव**—तें नाहीं का तुमच्या लक्षांत राहिलें ?

**चंपा**—( लाजल्यासारखें करून ) ऊंहुं, नाहीं बा माझ्या लक्षांत !

**अमृतराव**—मनुष्याला एखाद्या गोष्टीची आवड असली, ह्मणजे तीच पुनः दुसऱ्याच्या तोंडानें ऐकण्याची हौस वाटते !

**चंपा**—हें काय बाई ? एखाद्याच्या मेलं बळंच आं-

गशीं लावून ह्मणायचं ! न सांगाना बापडे, मी पुनः नाहींच विचारायची.

**साळू**—व्हय बगा अमृराव, कवा बी लगनाचं बोलनं काढल कीं चंपाताई लइ खुश होत्यात. ह्मणूनशानी त्यांस्नी चांगला नवरा बगून द्या बगा.

**चंपा**—आली मध्यें मध्यें चुरु चुरु बोलायला, हो बाहेर !

**साळू**—मला कुठ घालविताया ? मी तर तुमासंगच राह्याची. आईसाब मलाच अंदन देनार हैता, ठावं है का ?

**चंपा**—बरं बरं, आतां तरी जा बाहेर आणि बैस तेथें.

**साळू**—एकांतीं नवऱ्याचें नांव ऐकायला होव जनु न्हे ? उद्यां लगीन झाल्यावर तुमच्या खाशांसनी मला पाह्या गावायचें नाहीं वाटतें ? ही बगा चाललें, सांगा जी अमृतराव, समदं सांगा चंपाताईसनी, बरं का ?

**चंपा**—चावट मेली ! (साळू जाते.)

**अमृतराव**—अहो चंपाताई, यजमानांस आज दुसरें काम ह्मटलें ह्मणजे मालवणच्या मोहित्यांकडून तुमच्या लग्नाबद्दल जे गृहस्थ बोलावयास आले आहेत, त्यांच्याशीं बोलायाचें. आज चार दिवस वाटाघाट चालली आहे.

**चंपा**—मग पुढें ?

**अमृतराव**—हें किंवा दुसरीं दोन चार मोठाल्या जहागिरदारांकडचीं स्थळें पाहिलीं आहेत त्यांपैकीं एखादें स्थळ ठरणार असें दिसतें. (एकीकडे) पाहूं बरें आतां कसे काय उद्गार निघतात ते !

**चंपा**—(जरा स्वस्थ बसून सुस्कारा टाकिते.) अमृतराव, मनांतलं मीं कुणाजवळ बरं बोलावं ? आईसाहेब वडील,

त्यांच्यापुढें असलें बोलायला लाज वाटते. शिवाय चहाटळपणा दिसणार. ह्मणून दादांपुढें दोन शब्द बोलावे ह्मणत्यें.

**अमृतराव**—अलबत् बोला. लग्न ह्मटलें ह्मणजे त्या जन्माच्या गांठी. अशा कामांत चांगलाच विचार केला पाहिजे.

**चंपा**—अहो, आईसाहेबांनीं मला लहानाची मोठी केली, पोटच्या लेंकरासारखं बाळगलं, तेव्हां मला श्रीमंताचे घरीं द्यावी असें त्यांच्या मनांत येणें वाजवीच आहे. मी जर त्यांच्या पोटची असतें तर माझें लग्न केव्हांच झालें असतें. पण आपल्या मराठ्यांच्या चालीप्रमाणें ह्मणून एवढी वाढलें; आणि दादांच्या व तुमच्या सहवासानें लिहिणेंवाचणें सगळं शिकलें. त्यामुळें जन्माचा जो सहवास तो सुखाचा व्हावा असं वाटूं लागलं आहे. ह्मणून मी ह्मणतें कीं, माझ्या मनासारखें झालं तरच मी लग्न करीन. नाहीं तर तें मेलं लग्नच नको! तुमचें आणि आमचें हीं दोन्ही घराणीं मानकऱ्यांत मोठीं. मी तर माझे घराण्यांत एकटीच जन्मलें, आणि आईबाप निवर्तले. (डोळे पुशीत) पुढें आमचे घराण्यांतील एक मनुष्य नको का या दौलतींत राहायला? ह्मणून लग्नाशिवाय तशीच राहून आईसाहेबांची आणि दादांची सेवा करीन ह्मणजे झालें. यांतच मला सुख आहे.

**अमृतराव**—तुह्मी ह्मणतां कीं तुमच्या मनाजोगतें झालें तरच लग्न करीन! याचा अर्थ काय? हें मोघम बोलणें समजावें कसें?

**चंपा**—जरी लग्न झालं, तरी आईसाहेब व दादासाहेब यांची सेवा येथें राहून सतत घडायला हवी.

**अमृतराव**—आईसाहेबांच्या मनांतून मोठा जहागिरदार जांवई पाहावयाचा आहे. मग तसा जहागिरदार तुमच्याशीं लग्न लावल्यावर तुह्मांस येथें कशी ठेवील? अथवा तो तरी येथें येऊन कसा बरें राहील?

**चंपा**—मला तो जहागिरीचा मोठेपणा नको. आपल्या कर्तृत्वानें शहाणपणाचा मोठेपणा ज्यानें मिळविला आहे अशाची गांठ माझ्या मनाजोगती ब्रह्मदेवानं या नरगुंदांतच घातली असेल तर मात्र हें लगीन होणार आहे!
(इतक्यांत साळू येऊन).

**साळू**—ताटाची तयारी आहे, ताईसाहेब. किती वाटकूळ बोलत बसायच? उठा आतां.

**चंपा**—(तिरस्कारानें) येईन जा. चोंबडेपणाच भारी.
(साळू जाते.)

**अमृतराव**—तुह्मी ह्मणतां तसा या नरगुंदांत मला तर बुवा कोण दिसत नाहीं.

**चंपा**—हो खरेंच तें. मला मी दिसतें का?

**अमृतराव**—काय ह्मणतां कोण जाणे? तुमच्या मनांत असलेलें नांव सांगाल तर मात्र समजेल!

**चंपा**—इश् बाई, हें काय भलतंच? (सलज्ज मान खालीं करून) किती जरी मेलं पर्यायानं बोललें तरी दाटून वेडेपणा घ्यायचा!!

**अमृतराव**—हें माझ्या कांहीं लक्षांत येत नाहीं.

**चंपा**—मन जर का दुसरीकडे गेलें असलें, तर मात्र बाई कधींच लक्षांत यायचें नाहीं!

(पडद्यांतून) चंपा, अग चंपा, जेवायला नाहीं काग यायचं?

**चंपा**—(चपापून) अग बाई! आईसाहेब हाका मारताहेत. मी इतक्यांत जेऊन येतें, बसा. (असें अमृतरावास हळूच सांगून चंपा जाते.)

**अमृतराव**—(आपल्याशीं) मनुष्याला एखाद्या गोष्टीचा नाद लागला ह्मणजे, ती सफल होईपर्यंत किंवा तिची निराशा होईपर्यंत सदां त्याचें ध्यान तिकडे लागलेलें असतें! पाहा, ती येथून जातांना "मी इतक्यांत जेवून येतें, बसा" असें मागें वळून हळू हळू बोलत, हस्तसंकेत करून चालती झाली. त्या वेळचा तिचा आविर्भाव, नेत्रकटाक्ष हे जरी स्वाभाविक झाले असले तरी ते मला चित्तवेधक होऊन, श्रीमंतांचा निरोप कळविल्यानंतर येथें राहणें फाजीलपणाचें किंबहुना धोक्याचें जरी वाटत आहे, तथापि मकरंदस्वादाच्या आशेनें भ्रमर जसा कमलपुष्पास सोडून जाण्यास इच्छीत नाहीं, तद्वत या चंपावर लुब्ध झालेला जो मी त्या माझ्यानें हा तिचा रंगमहाल सोडून जाववत नाहीं! (महालांत इकडे तिकडे फिरून पाहून आपल्याशीं म्हणतो.) हें एथें काय बरें आहे? हत्ती, घोडे, गाई, ह्मशी, बाहुल्या, हीं भातुकलीच्या खेळांतील चित्रें, ह्या खेळांतील भांड्यांच्या उतरंडी, ह्या कशीदा काढण्याच्या सुया, रेशीम ठेवलेली सांगशी, आणि त्यांतच सागरगोटे. हें तसबिरी काढण्याचें सामान, निरनिराळ्या रंगाचे पेले आहेत. वाः! जाई, जुई, मोगऱ्याचीं फुलें, पाहा कशीं प्रतवार निवडलीं आहेत! नुसत्या कळ्या, अर्धवट उमलेल्या कळ्या, आणि फुलें; देवाकरितां सायंकाळचा हार तयार करण्याची ही सगळी तयारी दिसते. ह्या पोथ्या आहेत वाटतें. हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप. बरें ही चौरंगापुढें रांगोळी कसली?

ठीक! चित्रविचित्र वेलबुट्टी, स्वस्तिकें व गोपद्में, यांच्यामध्यें तरतऱ्हेचे रंग भरून ही रांगोळी कशी मनोरम झाली आहे! या महालांतील सगळ्या जिनसा कोठवर पाहाव्या? आवडत्या जिनसांचा संग्रह आणि त्यांची एकंदरीनें व्यवस्थेशीर मांडणी, येणेंकरून या महालास जास्त शोभा आणिली आहे. आधीं जात्याच सुगरण, त्यांत श्रीमंतांचा सहवास आणि तोही कोंकणस्थांशीं! मग काय विचारावें? ही रांगोळी घालून मांडलेल्या चौरंगावर रुक्मिणीस्वयंवराची पोथी आहे. वर हळदकुंकू, फुलें वाहिलीं आहेत. नुक्ताच स्वारीनें पाठ केला आहे, वाटतें! मुद्दाम याच पुस्तकाचें पारायण कां चाललें असावें बरें? एकूण स्वयंवराचा हेतु, आणि त्या प्रीत्यर्थ हें अनुष्ठान! परंतु तशा स्वयंवराचा हल्लींच्या काळांत प्रघात तरी कोठें आहे का? असो! आतां हें रेशमी रुमालानें झांकून ठेविलेलें काय आहे तें पाहूं. (तसबीर हातीं घेऊन) ही राधाकृष्णाची किंवा कृष्णरुक्मिणीची तसबीर काय? छेः! नव्हे. श्रीकृष्ण सांवळा आणि चतुर्भुज, तशी ही नाहीं! सीतारामचंद्राची असेल काय? नव्हे! श्रीरामचंद्र किरीटकुंडलें धारण केलेले धनुर्धारी असले पाहिजेत. (निरखून पाहून) वाः, तसबीर तर खूब सुरेख काढली आहे. हें नुसतें स्त्रीपुरुषांचें जोडपें दिसतें. पुरुषाचे तसबिरींत उदी मंदील बांधिलेला दाखविला आहे. काय? मी नेहमीं बांधतों तसला मंदील? (जवळच्या मोठ्या आरशांत पाहून) त्याचे पीळ पेंच सगळे तसेच! मला भ्रम तर झाला नसेल ना? (पुनः तसबीर हातांत असतां आरशांत पाहून) गळ्यांतील शिलेमण्यांचा कंठा, तरवारबिरवार आणि सगळा नेहमींचा पोषाख!

( तसबिरीकडे व आरशाकडे पाहत ) शिवाय चेहेरा सुद्धां हुबे-हूब जुळतो! हें आहे तरी काय? मी भांबावलों तर नाहीं ना? ( डोळ्यांवरून व कपाळावरून हात फिरवीत ) कांहीं सुचत नाहीं! असो! ( मागून चंपा येते ).

**चंपा**—( मनांत ) दोन पावलं आडमोरं उभं राहवं. तसबीर बघताहेत, काय उद्गार निघतात पाहूं बरं!

**अमृतराव**—( आपल्याशीं ) ही स्त्रियेची तसबीर कोणाची असावी बरें? जिचें यौवन अगदीं उचंबळून गेलें आहे, अशी ही सोळा वर्षांची तरुणी दिसते. हा केतकी-सारखा गौरवर्ण, केशकलापामधून भागीरथीप्रवाहासारखा निघालेला भांग, विशाळ कपाळीं लाविलेलें पिंपळपानी कुंकू, काळे व दाट केशयुक्त अशा कमानदार भिवया, आणि ते हरिणीसारखे सुंदर नेत्र, चांपेकळीसारखें सरळ नाक, कुंद-मुकुलाग्रासारख्या दंतपक्ति, पोवळ्यांसारखे लाल व कोमल आम्रपल्लवासारखे मृदु व पातळ ओंठ, शरीराचा बांधा नाजूक असूनही मनगट व दंड यांतील आभरणें जिथल्या तिथें जरा रुपल्यासारखीं दाखविल्यानें दिसणारा अवय-वांचा गोंडसपणा, खोंटेची लाली, हीं सर्व कशीं माझ्या मनोवृत्तींस जागृत करीत आहेत!

**चंपा**—( आपल्याशीं ) हे बोल ऐकून हर्षानें माझ्या अंगावर कसे शहारे येत आहेत!

**अमृतराव**—( तसबिरीकडे पाहात आपल्याशीं ) तसेंच पापण्यांचे लांब केंसांची दाखविलेली छाया, गालांवरील गुलाबी झाकी, फार गोल ना फार लांबट असा चेहरा, तोंडावरील गोजिरवाणी कांति, हनुवटीचे मध्यभागीं दाखविलेला सखलपणा, डावे गालावरील तीळ, आणि

निमुळता नितंबभाग इत्यादिकांकडे पाहून मला वाटतें हें रूप, ज्या इष्टदेवतेचें ध्यान माझ्या अंतःकरणांत सदोदित वास करीत आहे, तिच्याच मूर्तीशीं पुष्कळ अंशीं साम्य पावत आहे.

**चंपा**—( आपल्याशीं ) नसेल कशावरून ?

**अमृतराव**—( तसबीर हातीं असतां आपल्याशीं ) शाबास ! तेंही असो ! ही सुंदरी हातांत फुलांची माळ घेऊन, ती आपल्यासमोर असलेल्या ( जरा स्तब्ध राहून ) उंच व तरुण पुरुषाचे गळ्यांत घालण्याचा, चवड्यांवर ओणंबून राहून, यत्न करीत आहे व सलज्ज व प्रेमदृष्टीनें त्याजकडे पाहत आहे. शिवाय पदर बाजूस होईल ह्मणून तिकडे लक्ष ठेविलेंसें दाखवून व दोहोंपावलांमध्यें नेसलेल्या शालूचे ओंचे आणून ही उभी आहे यामुळें इचें स्वाभाविक अंगवळण व आविर्भाव कसे मनोहर दिसत आहेत!! काळ्या निळ्या अशा वस्त्रपरिधानाची नेहमींची आवड, काजळी शालू नेसविलेला दाखवून परिपूर्ण केली आहे काय ?

**चंपा**—( आपल्याशीं ) अग बाई ! माझी आवड कशी इतक्यांत लक्षांत आली ती !

**अमृतराव**—( तसबीर हातीं असतां आपल्याशीं ) ठीक, ठीक ! ( सानंद मुद्रेनें ) आतां मात्र बाळपणापासून पाहिलेल्या खुणेस खूण पटून मनाची खात्री होण्यांत बाकी राहिली नाहीं ! कारण, माळ घालण्याकरितां वर केलेल्या हातानें आंगावरील पदर बाजूस करून डावे कुशीवरील मत्स्य पाहा कसा माझ्या दृष्टीस पाडिला !

**चंपा**—( मनांत ) प्रिया, खात्री होण्याला इतका कां वेळ लागावा बरें ?

**अमृतराव**—( तसबीर हातांत असतां आपल्याशीं ) आतां या उपकारी हाताचें ( आपला हात पुढें करून ) हा माझा हात ग्रहण केल्यावांचून राहील काय ? बरें पण, अशी इच्छा करण्याजोगें सुकृत माझ्या संचितीं असेल काय ?

**चंपा**—( मनांत ) कोण भिडस्थ स्वभाव तरी हा ! कोठवर मेली शंका मनांत आणायची ! बरें तर, आतां यांच्या शंकेचें निवारण करण्याचाच यत्न केला पाहिजे ! ( असें ह्मणत जरा पुढें येऊन आरशांत दिसणाऱ्या अमृतरावाचे हातासरशीं आपल्या हाताचें प्रतिबिंब दिसेल अशा बेतानें उभी राहते. )

**अमृतराव**—( विस्मित होत्साता मागें पाहून ) अरे हें काय ! तुह्मी केव्हां आलां ?

**चंपा**—( खालीं मान करून ) आपली मनोवृत्ति जागृत झाली त्यापूर्वीं थोड्या वेळापासून मी येथेंच मागच्या बाजूस उभी आहें !

**अमृतराव**—( हास्यमुख ) तसबिरीकडे एकाग्र चित्त होऊन ती काढणारीच्या चातुर्याचें वर्णन करण्यांत मन निमग्न झाल्यामुळें कशाचेंच भान मला राहिलें नव्हतें !

**चंपा**—पण बाई मला मोठं नवल वाटतं, नुसत्या दोन रेघट्या ओढल्या आहेत त्यांची इतकी का प्रशंसा करायची ? त्यांतून मेली ती एकाच तसबिरीची इतकी काय ह्मणून !

**अमृतराव**—हें काय सांगावें ? ज्याला ज्याची आवड त्याची तो उघडच तारीफ करणार !

**चंपा**—एकूण यांत एवढं झालं, बाळपणापासून हा जो मला तसबिरी काढण्याचा नाद आहे, तो आज सफळ झाला !

**अमृतराव**—एवढ्यावरूनच कसें भागेल? यजमानांनीं जर ही पसंत केली तर मात्र खरें! होय ना?

**चंपा**—हें काय विचारावयाचें? (खालीं मान करून) ज्यांच्या प्रीतीचें बीजारोपण माझ्या अंतःकरणांत झालें आहे त्यांच्याच गळ्यांत त्यापासून वाढलेल्या वृक्षास आलेल्या प्रेमफुलांची माळ घालण्यानें मी या जगीं निरंतर सुखी होणार आहें, हें दादांस कळविण्याकरितां तर महत्प्रयासानें मुद्दाम मीं ही तसबीर काढली आहे. ही दादांच्या दृष्टीपुढें नेऊन उभयतांचे मनोगतास त्यांची संमति घेतल्यावांचून मी कशी बरं राहीन?

**अमृतराव**—हा सगळा प्रकार गरीबावर गंगा लोटल्यासारखा झाला आहे!

**चंपा**—तसें नव्हे! शैलजेचा अत्यंत निग्रह पाहून शंकरांनीं तिचा स्वीकार केला असें नाहीं का हें झालं?

**अमृतराव**—(चंपाजवळ जाऊन) प्रिये, खरोखर पाहा आज मी धन्य झालों!

**चंपा**—मग पहिल्यांदां कां इतके आढेवेढे घेणं झालं?

**अमृतराव**—कारण, तुह्मी पडलांत श्रीमंतांच्या घरच्या; मनांत जरी समजलों होतों तरी एकाएकीं खात्री पटेना!

**चंपा**—प्रिया, ज्यांत मनाचा आनंद तीच खरी श्रीमंती! शिवाय ज्यांच्या कृपेंकरून मी आज श्रीमान् ह्मटली जातें, त्यांच्याच कृपेनें आपणही श्रीमानच आहां. आणि तेच धनीसाहेब उभयतांच्या निरंतर समागमाचा योग आणून आह्मां उभयतांस खरे श्रीमंत करण्यास समर्थ आहेत!

**अमृतराव**—सत्य आहे. आमच्या महाराजांचा जयजयकार असो! येतों तर आतां?

**चंपा**—(दोन पावलें पुढें जाऊन) ठीक आहे, यावं तर मग आतां. (अमृतराव जातो.) (चंपा आपल्याशींच) मुख्य काम तर झालंच ! आतां दादांचं वचन घेतलं ह्मणजे झालं.

---

## प्रवेश ५ वा.

**स्थल**—सरकारवाड्यांतील व्यंकटरावसाहेबांचा महाल.

(अमृतराव प्रवेश करितो.)

**अमृतराव**—कोण आहेरे पाहऱ्यावर ? (हुजऱ्या पुढें येऊन)

**सटवाजी**—जी साहेब, मी सटवा.

**अमृतराव**—सटवाजी, सरकार काय करताहेत रे ?

**सटवाजी**—खास नुकतच चंपाताईकडून आले आन् तिसऱ्या पारीं आठ घटकेची वर्दी सांगा पाई हुकूम झाला ह्मनुन नुकताच चौकीदारासनीं ताकीद करुन शानी हंग बगा असाच येऊन बसलोया. करितबिरित कायबी नाहीं जी.

**अमृतराव**—अरे वेड्या, तूं काय करतोस हें मी तुला नाहीं विचारीत. आंत जाऊन बघ; खासे निजले असले तर उठवूं नकोस, पण जागे असतील तर मी आलों आहें ह्मणून कळीव.

**सटवाजी**—जी होय, जातो आन बगतो अदुगर. (आंतून येऊन) चलावं साहेब, सरकार बलावत्याती.

**अमृतराव**—(आपल्याशींच) एकूण यजमान चंपाकडे जाऊन आले आहेत. पाहावें आतां कसा काय रंग आहे तो. (अमृतराव व्यंकटरावास मुजरा करून उभा राहतो.)

**व्यंकटराव**—बसा अमृतराव, तुह्मी तर मोठे पाताळ-यंत्री दिसतां !

**अमृतराव**—काय केलें महाराज ?

**व्यंकटराव**—हं हं ! पाहा, कसे करून सवरून कानांवर हात ठेवितात ! शाबास ! यापेक्षां आणखी काय करावें ह्मणतां ? आंतल्याआंत एवढी मसलत, अशी लबाडी, आणि हें कपट आमच्याशीं ?

**अमृतराव**—सरकारच्या पायांपाशीं मला वाटतें मीं कांहीं कपट किंवा लबाडी केली नाहीं.

**व्यंकटराव**—अहो, लबाडी करणारा मी, तुह्मीं लबाडी केली असें कधीं तरी कोणी ह्मणेल का ?

**अमृतराव**—परमेश्वरसाक्षीनें सांगतों कीं, या पायांपाशीं मीं कसली लबाडी केली नाहीं.

**व्यंकटराव**—अमृतराव, आतां मात्र पराकाष्ठा केलीत खरी ! अहो, करणी करायची ती करून, वर शपथेला तयार ना ? वाहवा !

**अमृतराव**—(हात जोडून) या गूढ बोलण्यानें माझ्या काळजाचें पाणी होऊन गेलें आहे. या पायांपाशीं काय चूक केली आहे ती स्पष्ट सांगावी महाराज. (एकीकडे) चिन्ह बरें दिसत नाहीं ! आज चंपाचे महालांत घडलेल्या गोष्टीचा परिणाम तर हा नसेल ना ? निमाज पढतां मशीद गळ्यांत आल्यासारखें दिसतें !

**व्यंकटराव**—सांगायचें काय ? आंतल्याआंत फितुरी!

**अमृतराव**—सरकारच्या पायांपाशीं फितुरी केल्यावर अशा अपराधास खडतर शिक्षाच योग्य ! हा देह आपला आहे. वाटेल तें करावें.

**व्यंकटराव**—खडतर ह्मणून काय विचारितां ? अशी

शिक्षा देतों कीं, ज्याचें नांव तें! अहो जन्मभर तुमच्या गळ्यांत लोढणें बांधणार!

**अमृतराव**—महाराज, सरकारच्या आकस्मिक भाषणानें माझा जीव थरारून गेला होता. मुद्रा शांत दिसे, तरी शब्द रागाचे असल्यामुळें कांहींच तर्क चालेना. परंतु शिक्षेचे शब्द महाराजांच्या तोंडांतून निघालेले ऐकून मनांत आलेली शंका निघून गेली इतकेंच नव्हे, तर पुढें माझे आशेस अंकुरही फुटला!!

**व्यंकटराव**—अहो, आतां तुमचें आमचें नातें निराळें ठरलें, तेव्हां तुमच्याशीं थोडा विनोद करणें रास्त नव्हे का?

**अमृतराव**—मुख्य या पायांची कृपा.

**व्यंकटराव**—आंतल्याआंत दोघांनीं मथून तसबिरीच्या बहाण्यानें आपले हेतु ठरवून टाकिले, आणि आतां नुसता मोठेपणा मात्र आमच्याकडे द्यायचा! ठीक!

**अमृतराव**—महाराज, दोघेंही आपलींच लेंकरें आहोंत. मुलांनीं आईबापांस मोठेपणा देऊं नये तर द्यावा तरी कुणाला?

**व्यंकटराव**—अमृतराव, आजच्या आमच्या संतोषास पारावार नाहीं. अहो, लाख रुपयांच्या जहागिरदारांच्या इथें जरी चंपाला दिली असती, तरी खरोखर इतका कांहीं संतोष वाटला नसता. कारण अशा परस्पर प्रीतीनें जीं लग्नें होतात, त्यांसच लग्न हें नांव योग्य, आणि अशा प्रकारचीं दंपत्येंच या जगांत सुखानें नांदतात. आमचे अमृतराव लग्न करून घेण्याची टाळाटाळ कां करितात, हें आजपर्यंत बरोबर लक्षांत येत नसे, पण आतां त्यांतलें इंगित बाहेर पडलें!

**अमृतराव**—महाराज, परंतु आईसाहेबांच्या मनांत—( इतकें बोलून स्तब्ध राहतो. )

**व्यंकटराव**—तुमचें ह्मणणें मी समजलों ! आईसाहेबांच्या मनांत चंपाला जहागिरदारांच्या इथें द्यायची आहे हें खरें; पण तुमच्यासारखा सुशील, शहाणा, आमच्या पदरचाच असा नवरा तिनें आपणच पसंत केला, आणि ही तिची पसंती तुह्मीं आनंदानें आदरपूर्वक स्वीकारलीत, हें सर्व आईसाहेबांच्या कानीं गेल्यावर मजसारखाच त्यांसही संतोष झाल्यावांचून राहील असें तुह्मी समजतां काय ? तसेंच चंपाच्या नवऱ्याला आपल्या इच्छेप्रमाणें श्रीमंत करण्यास आईसाहेबांस अशक्य आहे काय ?

**अमृतराव**—सरकारच्या मनास आल्यावर काय नाहीं होणार ?

**व्यंकटराव**—अहो ब्रह्मसूत्र चुकत नाहीं, त्यांस अनुसरून सर्व गोष्टी घडून येणार. बरें तर आतां मी आईसाहेबांस हा सर्व मजकूर कळवून उद्यां मार्गशीर्षांत लग्न ठरवितों ह्मणजे झालें.

**अमृतराव**—( हात जोडून ) सरकारच्या या औदार्यानें आह्मी उभयतांही महाराजांचे ऋणी आहोंत !

( इतक्यांत चवकीवर आठ घटका वाजल्याची वर्दी होते. )

**व्यंकटराव**—अमृतराव चला आतां आपण सदरेवर जाऊं. टिपूकडील वकील कचेरीस येण्याची वेळ झाली.

**अमृतराव**—चलावं महाराज.

( सर्व जातात. )

**पहिला अंक समाप्त.**

---

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

### स्थल—सरकारवाड्यांतील सदर.

( काळोपंत आप्पा पेठे कारभारी आणि कृष्णाजीपंत हे दोघे प्रवेश करितात. )

**काळोपंत**—काय हो कृष्णाजीपंत? मुकुंदराव वकील यजमानांस भेटून करणार काय? त्याला जें सांगायचें तें आह्मीं निक्षून सांगितलेंच आहे.

**कृष्णाजीपंत**—( एकीकडे ) इथें याच्या धोरणानें तर बोललेंच पाहिजे. ( उघड ) तें सगळें खरें, पण लढाई न होऊं देतां तंटा मिटविला, नरगुंदकरांकडून खंडणी कबूल करविली, अशी फुशारकी टिपूसुलतानाकडे मिरविण्याकरितां ही त्यानें सर्व खटपट चालविली आहे, परंतु जेथें मी मी ह्मणणाऱ्या शहाण्यांची सुद्धां डाळ शिजणें कठीण तेथें या मुकुंदरावाचें काय चालणार? आपली मसलत केवढी खंबीर! सूर्यापुढें काजव्यानें आपली प्रतिष्ठा मिरविल्यासारखें एथें याचें होणार आहे! तो यजमानांची गांठ एकांतीं घेण्याच्या खटपटींत होता; परंतु तशी गांठ पडायची नाहीं असें मीं त्याला साफ कळविलें.

**काळोपंत**—शाबास, चांगलें केलेंत; एकूण तो गुलाम यजमानास एकांतीं गांठून फसविण्याच्या उद्योगांत होता काय?

**कृष्णाजीपंत**—चोहोंकडून त्याची एकसारखी खटपट

चालली होती. (थोडेंसें हंसल्यासारखें करून) पण मीही त्याच्या पाळतीवर राहून त्याचें बिलकूल चालूं दिलें नाहीं.

**काळोपंत**—हं! हं! त्याच्या मतें यजमान लहान, समजूत कमी, असें असेल, परंतु वय लहान ह्मणून बुद्धि लहान कीं काय?

**कृष्णाजीपंत**—हें काय विचारावें? ते मोठे चतुर आहेत. वयावर काय आहे? माशांच्या पिल्लांना पोहणें शिकवावें लागतें काय?

**काळोपंत**—असें खरें, तरी अद्याप जगाचा अनुभव हवा. आणखी पांचदहा वर्षें गेलीं पाहिजेत.

**कृष्णाजीपंत**—(गंभीर मुद्रेनें खालीं वर मान करीत) होय! होय! अगदीं खरें! अनुभव कोठून असणार? दिवस का अद्याप झाले आहेत? अजून एक समजतें तर एक नाहीं. त्यांतून श्रीमंतांचें मूल!

**काळोपंत**—असें नका समजूं, ते इतर श्रीमंतांचे मुलांसारखे नव्हत; शिवाय या **भावे** घराण्यांतील पुरुषांना लहान ह्मणतां कामास नये. कारण, यांचे वडील, आजे, यांणीं या वयांतच मोठमोठाल्या मोहिमी केल्या, राजकारणी मसलतींत अकला लढविल्या, आणि तेंच पाणी यांच्यांत आहे बरें? कमी नका समजूं.

**कृष्णाजीपंत**—होय, यांत काय संशय? सिंहाचा छावा उपजतच शूर असतो! कामाधामांत सुद्धां ग्रहणशक्ति विलक्षण! शिवाय मोठे खोल व धूर्त! त्यांतून आपलें शिक्षण! मग काय?

**काळोपंत**—आतां तुह्मी होतांच जवळ. मुकुंदराव

भेटीस येणार त्यासंबंधानें केलेल्या सूचनेचें धोरण ओळखून लगेच कसें उत्तर झालें तें ऐकलेंत ना ?

**कृष्णाजीपंत**—तें ऐकून मी तर थक्क झालों ! विलक्षण बुवा दूरदर्शी ! ( मुकुंदराव प्रवेश करितो सर्व उठून ताजीम देऊन बसतात. )

**काळोपंत**—( मुकुंदरावाकडे वळून )तब्बेत ठीक आहे ना?

**मुकुंदराव**—बहुत उत्तम आहे.

**काळोपंत**—आपली बरदास्त नीट राहिली आहे ना ?

**मुकुंदराव**—येथें कशाची कमताई का आहे ?

(संस्थानचे मालक व्यंकटरावसाहेब अमृतरावासह प्रवेश करितात.)

**चोपदार**—खडी ताजीम ! पेष निगा सलाम ! ( सर्व उठून नमस्कार मुजरे करून आपआपल्या जागीं बसतात. )

**मुकुंदराव**—( संस्थानिकांस उद्देशून ) मला येऊन बरेच दिवस झाले. निरोप घेऊन लवकर जावें ह्मणतों.

**व्यंकटराव**—एकूण आमच्या या लहानशा वस्तीस कंटाळलां वाटतें ?

**मुकुंदराव**—असें कांहीं नाहीं. परंतु आलेल्या कामगिरीबद्दल लवकर निकाल समजून घेऊन येण्याविषयीं आमच्या सरकाराकडून वरचेवर मला तगादा चालला आहे. ह्मणून जाण्याची गडबड. काळोपंत आप्पांनीं सर्व मजकूर कानांवर घातलाच असेल ?

**व्यंकटराव**—आप्पांनीं मजकूर कळविला आहे, तरी आपलें ह्मणणें काय आहे तें आतां उघड सांगावें.

**मुकुंदराव**—ह्मणणें ह्मणून इतकेंच कीं, टिपूसुलतान बहाद्दर यांचा धनीपणा जसा या प्रांतांतील इतर पाळेगार,

संस्थानिक, देसाई वगैरेंनीं मान्य करून खंडणी कबूल केली आहे, तसें आपणही करावें.

**व्यंकटराव**—इतरांनीं टिपूचें ह्मणणें कबूल केलें असेल, परंतु तसें आह्मांस करितां येणार नाहीं. कारण आह्मी करवीरछत्रपति यांचे अष्टप्रधानांपैकीं सचीव आहों; हल्लीं श्रीमंत पंतप्रधान पेशवे हे सातारचे महाराज छत्रपति यांचे प्रतिनिधि या नात्यानें या सर्व राष्ट्रावर मालकी चालवीत आहेत; त्याअर्थीं पेशव्यांचा धनीपणा पत्करून त्यांचे मांडलिक होऊन राहिलों आहों. याशिवाय आह्मी दुसऱ्याचा धनीपणा कदापि कबूल करणार नाहीं.

**मुकुंदराव**—चार वर्षांमागें टिपूसुलतान यांचे वडील हैदरखान बहाद्दर हे या प्रांतीं आसपास आपला अंमल बसवीत चालले तेव्हां इतर पाळेगारांप्रमाणें आपणाकडूनही बहाद्दरांनीं धनीपणा कबूल करविला आहे. ( काळोपंताकडे हात करून ) कां आप्पा, होय ना ?

**काळोपंत**—( जरा रागानें ) काय मुकुंदराव बोलतां हें ? आह्मीं हैदराचा धनीपणा तेव्हां कबूल केला असता तर तुह्मांस पुनः त्याच कामगिरीबद्दल इकडे येण्याची आज गरज कां पडती ? धनीपणा कबूल करीत नाहीं असें त्या प्रसंगीं ज्याणें सांगितलें तो हा काळो भैरव पेठे पाहा ( छातीवर हात ठेवून ) मूर्तिमंत तुह्मांपुढें बसला आहे.

**व्यंकटराव**—त्यावेळेस जें उत्तर मिळालें तेंच आतां, असें, मुकुंदरावजी, आपण स्पष्ट समजा.

**काळोपंत**—( खेदयुक्त ) यवनांचें स्वामित्व पतकरणें यासारखें हीनत्व ब्राह्मणांस दुसरें कोणतें आहे याचा,

मुकुंदराव, आपण दूरवर विचार करून मग काय बोलणें असेल तें बोला.

**मुकुंदराव**—मग आपण ब्राह्मण असून मराठ्यांचें स्वामित्व कां कबूल केलेंत ? छत्रपति मराठे ना ?

**काळोपंत**—( ससंतापाश्चर्यानें ) काय ह्मणतां ? मराठे ! अलबत आह्मी मराठ्यांचा धनीपणा कबूल करूं. यवनांची मराठ्यांशीं साम्यता करूं पाहतां काय? खबरदार पुन्हा असें बोललांत तर ! मराठे हे कोण आहेत असें तुह्मी समजतां ? जातिवंत मराठा आणि रजपूत हे क्षत्रियस्थानापन्न होत. त्याअर्थीं राहिलेल्या इतर तीन वर्णांस त्यांचें राज्यसत्तेचें प्रभुत्व भूषणार्ह आहे. अहो पाहा, जेथपर्यंत ब्राह्मण, रजपूत, मराठे हे ऐक्यभावानें राहतील तेथपर्यंत ही आपली हिंदु राष्ट्रीय सत्ता आपल्या ताब्यांत राहून या भरतभूमीचे आपण खरे लाल आहोंत ही प्रतिष्ठा कायम राहील; इतकेंच नव्हे, तर येणेंकरून चारी वर्णांस सर्व प्रकारचें सुखही मिळेल. आणि जर आपल्यासारखे ब्राह्मण व इतर हिंदु द्रव्यादिकांच्या अभिलाषानें यवनांस असे मथून राहत जातील तर दिवसेंदिवस ही आपली सत्ता मावळत जाऊन शेवटीं सत्ता व धर्म हीं दोन्हीं भ्रष्ट होऊन या क्रूर यवनांचें दास्य करूनच निर्वाह करावा अशी आह्मां सर्व हिंदूंवर पाळी येणार आहे, हें पुरतें लक्षांत आणा. शिवाय, तुह्मीं स्वतः "न नीचो यवनात्परः" या स्मृतिवाक्यानें तूत आपली मनोदेवता जागृत करून पाहाल तर आजपर्यंत यवनांचे दास्यत्वानें तुमचें पूर्वसुकृत किती नष्ट झालें आणि पापाचा डोंगर तुमच्या डोकीवर केवढा वाढला, हें तुह्मांस कळून, या अधर्माचरणाच्या प्रायश्चित्ताबद्दल श्रीरंगपट्टणास

टिपूकडे परत न जातां तुह्मी महायात्रेचाच रस्ता मुकाट्यानें धराल हें खचीत आहे.

**मुकुंदराव**—आपले यजमान ब्राह्मण, आपण ब्राह्मण, असें असून, ब्राह्मणांनीं नुसती स्नानसंध्या तपश्चर्या करावी, परमार्थ साधावा, इतर वर्णांचे हिंदूंस कर्ममार्गाचा उपदेश करावा, त्यांचें अभीष्ट चिंतावें, तें सगळें सोडून देऊन हें संस्थान, ही राजसत्ता, आणि हातांत शस्त्र धरून शत्रूंशीं लढाई हे क्षत्रियधर्म तुह्मां ब्राह्मणांस उचित आहेत काय? यावरून अधर्माचरणाचा दोष माझ्या एकट्याकडेसच येत नाहीं.

**काळोपंत**—(आश्चर्यानें) "इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि" हें भारती युद्धांतील महाविख्यात द्रोणाचार्यांचें वाक्य तुह्मांस अवगत असतें तर आह्मांस हा प्रश्न तुह्मीं केला नसता. (व्यंकटरावसाहेबांकडे वळून) महाराज, म्लेच्छांच्या सहवासानें मुकुंदरावजींची स्वधर्माची माहिती बरीच मलीन झाली आहे असें ह्मटलें पाहिजे.

**मुकुंदराव**—यावेळीं धर्मसंबंधी चर्चा करीत बसण्याचें मला प्रयोजन नाहीं. ज्यांचें अन्न खातों त्यांची इमानानें चाकरी करावी एवढेंच मला ठाऊक आहे. सबब पुन्हा आपल्यास सांगतों कीं, पेशव्यांच्या भिस्तीवर हें आपलें उमेदीचें बोलणें असेल, परंतु आपण हें पक्कें लक्षांत आणा कीं टिपूसुलतान याची सत्ता दिवसेंदिवस वाढतच चालली आहे; ते आतां पेशव्यांस हारीं जाण्याजोगे नाहींत. ह्मणून आपण प्रस्तुतच्या कालमानाकडे लक्ष देऊन त्यांचेंच स्वामित्व कबूल करावें.

**काळोपंत**—(ईर्षेनें) मुकुंदराव, पेशव्यांस टिपू हारीं

जाणार नाहीं काय ? काय बोलतां ! श्रीमंत पेशव्यांचे सरदार पटवर्धन, रास्ते, होळकर, त्रिंबकराव मामा या महावीरांनीं तुमच्या हैदरखानास कित्येक वेळां जर्जर करून सोडलें आहे. इतकेंच नव्हे, तर श्रीरंगपट्टणास वेढा दिला त्यावेळीं त्याला केवळ जेरीस आणिलें होतें. हें सर्व तुह्मी विसरलां वाटतें ? अहो, चिक्कबाळापूरच्या लढाईतील तुमच्या फौजेची कत्तल, गुरमकोंडा किल्ल्याची सर, शिवाय श्रीरंगपट्टणच्या आलीकडील मोतीतलावाजवळ झालेल्या लढाईंत तुमच्या फौजेची दाणादाण, तसेंच त्या लढाईंत हैदर व टिपू शिकस्त होऊन, पेशव्यांच्या सरदारांचे भीतीनें पंचवीस स्वारांनिशीं त्यांनीं केलेलें पलायन या घडलेल्या सगळ्या गोष्टी नीट आठवा, आणि नंतर तुमच्या धन्याच्या थोरवीचें वर्णन करा !

**व्यंकटराव**—मुकुंदराव, टिपूच्या शौर्याचें भय आह्मांस दाखवून, त्याला आह्मीं शरण जावें अशाविषयीं तुमचा यत्न चालला आहे. धन्य तुमची ! अहो, तुह्मी ब्राह्मण ना ? मग गळ्यांतील यज्ञोपवीताचा अभिमान कोणीकडे राहिला ?

**मुकुंदराव**—या जानव्याचे अभिमानास्तवच तर हें देवब्राह्मणांचें अधिष्ठानरूप आपलें संस्थान यवनांचे हातीं न जावें ह्मणून, या सामदामाच्या गोष्टी सांगत आहें; नाहींपेक्षां, एका शब्दानें काम आटपून केव्हांच गेलों असतों.

**काळोपंत**—शाबास ! मुकुंदराव शाबास ! ब्राह्मणांची पायमल्ली करून यवनांचें वर्चस्व वाढविण्याचा यत्न करणारे तुह्मी खरे हिंदुधर्माभिमानी आहां !

**मुकुंदराव**—आप्पा, प्रसंगास अनुसरून वागाल तरच सर्व कामें पल्ल्यास पोंचतील. राजकारणी कामांत अविचार, दुराग्रह, व हेकडपणा काय कामाचा?

**काळोपंत**—(संतापून) यवनांस शरण जात नाहीं असें ह्मणणें हा हेकडपणा काय? अहो, या दुष्ट यवनांनीं पुष्कळ वेळां या आमच्या देशावर स्वाऱ्या करून आमच्या पवित्र सिंहासनास लाथाडून देऊन त्याजागीं आपलें तक्त स्थापिलें, कितीएक हिंदु राजांचा समूळ नाश केला, कांहींकांस पादाक्रांत करून आपले मांडलिक बनविलें, लाखों रुपये खर्च करून बांधलेल्या देवालयांचा विध्वंस केला आणि आंतील मूर्ति फोडून टाकल्या, हजारों देवालयांच्या मशीदी करून त्यांत निमाज पढूं लागले, देवादाय धर्मादाय अन्नछत्रें वगैरे बुडविलीं, (दांत ओंठ चावून त्वेषानें) आपलीं पोटें जाळण्याकरितां निःशंक गोवध करूं लागले, आणि लाखों हिंदूंस जुलमानें बाटविलें. अशा नानाविध दुष्ट उपायांनीं आपला सनातन हिंदु धर्म बुडविण्याचा यत्न करून शेंकडों वेळां देशही लुटून फस्त केला. (करुणापूर्वक) हर हर! अशा छळानें चारशें वर्षें ही आपली भरतभूमि गांजून गेली बरें! परंतु पाहा, परमेश्वराची लीला अगाध आहे! त्याच्याच कृपेनें श्रीशिवाजी छत्रपति महाराजांनीं महान् भगवद्भक्त श्रीरामदासस्वामी यांचें धर्माभिमानाचें भगवें निशाण हातीं घेऊन या दुष्ट यवनांचा पाडाव केला, स्वराज्याची पुनरपि स्थापना केली, व स्वधर्माची प्रवृत्ति केली! (पुनः त्वेषानें) व त्या छत्रपति महाराजांचेंच ब्रीद राखण्याकरतां, कायावाचामनेंकरून निश्चयानें आह्मी झटत असतां त्या करण्याला दुरा-

ग्रह, अविचार, हेकडपणा अशीं दूषणें तुह्मी देतां तेव्हां काय ह्मणायचें? तुह्मी ब्राह्मण पडलांत, नाहींपेक्षां जी जिव्हा या अशा उण्या शब्दांनीं दूषित झाली तिचा या घटकेंत छेद करून टाकिला असता, समजलांत?

**मुकुंदराव**—( संस्थानिकांस उद्देशून ) आप्पांस माझ्या बोलण्याचा राग आला, इलाज नाहीं. तथापि मी पुनरपि सांगतों कीं, आपण माझें ऐकावें. टिपूशीं वैर करणें ह्मटलें ह्मणजे बलवत्तरांशीं स्पर्धा केल्यासारखें होणार आहे.

**व्यंकटराव**—चिंता नाहीं. आमचा दृढनिश्चयच आह्मांस तारील.

**मुकुंदराव**—एकूण आतां मात्र माझा उपाय थकला. आपण माझें बोलणें खास ऐकत नाहीं असें झालें.

**व्यंकटराव**—निखालस नाहीं.

**मुकुंदराव**—तर आतां हें माझें अखेरचें बोलणें ऐकावें. टिपूसुलतान बहाद्दर यांजकडून पायदळ, स्वारांचें रिसाले, तोफखाना अशी चाळीस हजार फौज जंगी सरंजामानिशीं सैय्यद बुऱ्हाणुद्दिन या सरदाराबरोबर आपल्या पारिपत्यास पट्टणाहून निघून तुंगभद्रेवर येऊन थडकली आहे. सरकारच्या निरोपाप्रमाणें मी इकडे येऊन आपल्यास मजकूर कळविला, आपण माझें ह्मणणें कबूल करीत नाहीं, तेव्हां मी इकडून आमच्या फौजेंत जाऊन पोहोंचतांच, फौज तेथून कूच करून नरगुंदावर येईल. तथापि अद्याप आपला इरादा आमच्या सरकाराशीं सल्लयानें वागण्याचा असल्यास, आजपासून एक महिन्यांत आपला वकील आमचे दरबारीं पाठवून तह करून घेण्याचा असेल तर घ्यावा.

तेथपर्यंत फौज पुढें चाल करून येण्याची तहकुबी करतां येईल. पाहा, याउप्पर आपल्या विचारास येईल तसें करावें.

**व्यंकटराव**—ज्या पेशव्यांनीं छत्रपति महाराजांच्या डंक्याचा नाद अटकेपर्यंत नेऊन पोंचविला आहे त्या पेशव्यांच्या सत्तेवर शस्त्र उगारण्याची हिम्मत टिपूची असेल तर खुशाल येऊंद्या. त्याला दोन हात दाखवितां येतील.

**काळोपंत**—(रागानें) मुकुंदराव, तुह्मी आपल्या टिपूस जाऊन असा निरोप कळवा कीं, हा काळाचा काळ काळो भैरव येठे पारिपत्यास येणाऱ्या मुसलमानांच्या मुडद्यांची शेज पट्टणापर्यंत नेऊन पोंचविण्यास तयार आहे !

**मुकुंदराव**—या उप्पर आपल्या इच्छेस येईल तसें करावें. आमचें सांगणें संपलें, आतां निरोप व्हावा.

**व्यंकटराव**—ठीक आहे. (विडे वांटल्यावर कचेरी बरखास्त होऊन सर्व जातात.)

---

## प्रवेश दुसरा.

### स्थल—सदर.

(संस्थानिक, कारभारी वगैरेंसह प्रवेश करितात.)

**व्यंकटराव**—आप्पा, टिपूशीं लढाई देण्याचें तर ठरलेंच; पुढील तरतूद कशी काय करणार ?

**काळोपंत**—महाराज, पेशव्यांच्या दरबारीं आपले वकील गणेशपंत माटे आहेत, त्यांचे मार्फत घडलेला सर्व मजकूर नाना फडनवीस यांचे कानावर घालून तिकडून कुमक येईलसें केलें पाहिजे; शिवाय इकडील तयारीही कडेकोट ठेविली पाहिजे.

**व्यंकटराव**—ठीक आहे, तसें करावें.

**कृष्णाजीपंत**—या बाबतींत माझी थोडी विनंति आहे, आज्ञा झाल्यास कळवितों. एक महिन्यांत लढाईची तयारी करणें, आणि पुण्याहून कुमक आणविणें, ह्मणजे अवधि थोडा राहिला.

**व्यंकटराव**—मग तुमचें काय ह्मणणें आहे ?

**कृष्णाजीपंत**—एवीतेवी वकील पाठवावा असें मुकुंदरावाच्या बोलण्यांत आलेंच आहे. तेव्हां इकडून चांगला हुशार वकील टिपूच्या दरबारीं पाठवून द्यावा आणि कांहीं भुलथापीचें बोलणें चालवून पुण्याकडील कुमक येऊन सर्व जंगजोड तयारी होईपर्यंत टिपूस नादीं लावून ठेवावें.

**व्यंकटराव**—ही युक्ति बरी दिसते. आप्पा, याविषयीं आपण विचार करून काय तें ठरवा.

**काळोपंत**—आज्ञा. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

**स्थल**—कृष्णाजीपंताचें घर.

( वेणूबाई ओटीवर उभी असतां कृष्णाजीपंत बाहेरून येतात. )

**वेणूबाई**—आज वाड्यांतून येण्याला इतका कां बरं उशीर ? दुपारीं देखील हातावर पाणी पडण्याची फुरसत, गडबडीनं जाणं झालं. कालपासून पाहतें, मनाला स्वस्थता नाहीं !

**कृष्णाजीपंत**—अग होय, तसेंच झालें होतें! आतां मात्र निश्चित झालों. ( उभयतां खोलींत जातात. )

**वेणूबाई**—इतकी चिंता कसली पडली होती ती ?

**कृष्णाजीपंत**—अग, हें काय विचारतेस ? कं
राग्रह त्या आप्पांचा ! त्या टिपूच्या वकिलाचें ह्मणणें
ऐकिलें नाहीं ! तेव्हां तो टिपू या नरगुंदावर स्वारी
णार ! त्याचा वकील चाळीस हजार फौज जंगी
मानिशीं येणार ह्मणून बोलला, तें ऐकून बघ माझें
घडघडलें ! अग, आपण ब्राह्मणगडी ! पोटाच्या
लागून इथं आलों ! आणि तुरीसरशी बरड चिरड
यांच्याबरोबर आपली राखरांगोळी होऊन जाणार !
युक्तीनें येथून कसें पार होऊन जावें या विवंचनेंत
शेवटीं मसलत तर पार केली !

**वेणूबाई**—ती कशी काय ?

**कृष्णाजीपंत**—अग, काय पुसतेस ? तुपांतू
ठावें तें साखरेंत, आणि साखरेंतून तुपांत.

**वेणूबाई**—अशा युक्त्या तुमच्यांत शेंकडों
आहेत, पण मला तर जरा ऐकूंद्या.

**कृष्णाजीपंत**—टिपूकडे वकील धाडण्याच्या
धानें यजमानांच्या आणि आप्पांच्या मनांत खूब
दिलें आणि त्या वकिलीवर मीच जाण्याचें ठरविलें !

**वेणूबाई**—तिथें जाऊन तुह्माला मिळणार का

**कृष्णाजीपंत**—काय मिळणार ह्मणून विच
काय ? अग, तिथें मोठा लाट आहे ! !

**वेणूबाई**—इथं तरी कमी आहे का ?

**कृष्णाजीपंत**—हा भावडे ! अग, हें नरगुंद
शिंपल्या एवढें संस्थान. 'ऊ विईल काय आणि लीख
काय ?' या ह्मणीसारखें इथें राहून काय होणार
टिपूची रियासत मोठी, चोहींकडे त्याचा दरारा पसर

हल्लीं पेशवे, निजाम सुद्धां त्याचे मुकाबिल्यास टिकणें कठीण. तेव्हां त्याच्या रियासतींत शिरून, त्या दरबारांतील खानसाहेब मियांसाहेब यांच्या मर्ज्या संपादून या लढाईचे प्रसंगांत नरगुंदकरांकडील आणि पेशव्यांकडील व्यंगें सांगून मी आपली कावेबाजी लढवीन! आणि दैववशात् त्याचे हातीं हा प्रांत गेल्यास मला या प्रांताचा सरसुभा कां नाहीं मिळणार? मग काय? हे कृष्णाजीपंत सरसुभे! वाः! नांव तरी किती भपकेदार दिसणार आहे बरें? हें पाहा, 'कुचेष्टेवांचून प्रतिष्ठा वाढत नाहीं' अशी जी परंपरा ह्मण आहे ती उगीच आहे का? अशा राजकारणी घडामोडींत संधि साधल्यास कुचेष्टाच चालविली पाहिजे! तरच नांवारूपास येईन.

**वेणूबाई**—अहो, हें सगळं खरं. पण कारभाऱ्यांचा आणि तुमचा अगदीं जिवास जीव मिळून गेलेला; तेव्हां अशा स्नेहांत हें करणं कारभाऱ्यांच्या आणि संस्थानच्या उलट केल्यासारखं नाहीं का बरं व्हायचं?

**कृष्णाजीपंत**—अग, तुला शहाणी ह्मणावी का ह्मणावें तरी काय? हें बघ, जिकडे आपला स्वार्थ तिकडे स्नेह! आतां तिकडचा एखादा भक्कम खानसाहेब धरतों हातीं ह्मणतों ना?

**वेणूबाई**—बरें, पण हे अघोरकर्मी दुष्ट मुसलमान आणि त्यांच्यांत शिरायचं ना?

**कृष्णाजीपंत**—काय सांगावं, तुह्मां बायकांचा कारभार चुलीपुढें! तुमच्या लक्षांत कोठून येणार? अग, (हंसतो) असेना टिपू मुसलमान, मारीना गाई, करीना ब्राह्मणांचा छल, होईनात देवळांच्या मशिदी, बुडेना हिंदुधर्म, आणि तो

करीना हवीं तितकीं अघोर कर्मै, त्यांत आपलें काय गेलें ? आपण आपली तुंबडी भरण्याची गरज ठेवावी ह्मणजे झालें ! नाहीं तर आपले आप्पा कारभारी ! मुसलमानांस शरण जाणार नाहीं ! यंव करीन ! त्यंव करीन ! अशा यांच्या फुशारकीच्या नादीं लागून जर इथें राहीन, तर आजच्या प्रसंगावरून पाहतां, आजपर्यंत मिळविलेलें सर्वस्व जाऊन शेवटीं प्राणावर येऊन बितणार ! या नरगुंदकरांची सगळी आठ दहा हजार फौज ! ती त्या टिपूच्या बलाढ्य सैन्यापुढें कशी बरें टिकावी ? एका क्षणांत होरपळून जाईल.

**वेणूबाई**—यांचं यांना नाहीं का सामर्थ्य कळत ?

**कृष्णाजीपंत**—अग, पेशव्यांच्या भिस्तीवर यांच्या या सगळ्या उड्या आहेत, परंतु पुण्याची स्थिति कितपत आहे हें मी पूर्तेपणीं समजून आहें.

**वेणूबाई**—समजा घटकाभर, पेशव्यांनीं नरगुंदकरांस मदत केली व टिपूला हटविलें; तर मग कसं ?

**कृष्णाजीपंत**—हा वेडे ! अग, विजार शिवणारा जो आहे तो जागा राखल्यावांचून का ती शिवील ? इतकें का नाहीं मला कळत ? टिपूची सरशी व नरगुंदकरांचा मोड हीं धडधडीत पाहिल्यावांचून मी ह्मणून आपलें आंग टिपूकडे आहे असें उघड दाखविणार नाहीं. दोहों डगरींवर हात ठेवून राहतों, आणि प्रसंग येईल तिकडे उडी मारतों ह्मणजे झालें. इतक्यांतच या नरगुंदकरावर अक्षता टाकून जातों असें तूं समजली आहेस वाटतें होय ? छेः, तसें कधीं नाहीं करणार. इकडील ताबेदारी बरबर आहेच. कदाचित् हटलाच टिपू तर त्याबद्दलचें श्रेय मीच घेऊन नरगुंदकरांकडून इनाम उपटीन ! शिवाय पेशव्यांच्या दरबारीं शिफा-

रस मिळवीन ! नवरा मरो का नवरी मरो, कुणीकडून हा पठ्ठ्या आपली पोळी यथेच्छ तुपांत बुचकळल्यावांचून राहणारा नव्हे ! हें तूं जाणत असून मग कां बरें शंका घेतेस ?

**वेणूबाई**—अहो हें काय ? मनाचा मेला संशय फेडला. बरं, पण हा टिपू अविचारी आहे ह्मणून ऐकतें. त्यांतून मुसलमानी दरबार ! मागं जसं त्या अंदाधुंदी हैदराबादेंत तुमच्या आंगाशीं आलं तसं तिथं न येवो ह्मणजे झालं.

**कृष्णाजीपंत**—लागली काढायला हैदराबाद, हैदराबाद! तेथें तरी कांहीं कमी केलें होतें का? त्या दरबारांत नायब पेषकार श्रीनिवासराव याचें काय तें अधिष्ठान. त्याची मर्जी कशी सुप्रसन्न केली होती बरें ? माझ्यावांचून काडीसुद्धां हालत नसे. तो पुरा वैष्णव, तेव्हां त्या गुलामाचे मर्जीखातर, वीतवीतभर कपाळीं कोळशाचा आंगारा, गोपीचंदनाचे पट्टे आणि मुद्रा ठोकून पुरा वैष्णव बनून राहिलों होतों. दोन वर्षांत शिवनामाचा उच्चार तरी केला का ? असें करून शेवटीं चिटनिशी नाहीं का पटकाविली ? ती अंदाधुंदी रियासत ह्मणूनच पैशाची रेलचेल झाली. कां, होय का नव्हे ?

**वेणूबाई**—होय, तें तर खरंच.

**कृष्णाजीपंत**—अग, जरी अंगावर आलें, तरी जीव आणि द्रव्य हीं घरीं वांचवून आणलीं ना? जाईना बेटी अब्रू, ती कितीकदां येते आणि कितीकदां जाते. तिचें काय मोठें महत्व ! तिथें गेली आणि इथें या नरगुंदांत ती पुनः हवी तितकी मिळविली. इथें तरी काळोपंत आप्पा कारभाऱ्यांकडे

कसें बस्तान बसविलें आहे, हें तूं पाहातेसच. माझ्यावांचून त्यांचें कांहीं तरी चालतें का ?

**वेणूबाई**—छेः, मुळींच नाहीं.

**कृष्णाजीपंत**—( छातीस हात लावून ) त्यांच्या भरंवशाचा खांब काय तो मी आहें ! या कृष्णाजीपंतावांचून आप्पांची कसलीही मसलत उलगडायाचीच नाहीं, असें बस्तान बसविलें आहे ! आणखी काय हवं ! दीडवर्षांत दरबारची नवी जुनी सर्व मंडळी मागें टाकून आप्पांचा नाकांतील बाल बनून राहिलों आहें हें साधारण का ?

**वेणूबाई**—अंगीं तसं करतुत्वच आहे !

**कृष्णाजीपंत**—अग, ज्या दरबारांत ज्याचें वर्चस्व असतें त्याची एकाची मर्जी संपादिल्यानें सगळ्यांना कोंपऱ्यांत बसवून आपला टेंभा मिरवायाला मिळतो !

**वेणूबाई**—असं तर खरं. मला दिखील बघा, आतांशा घरचं पाहायला इतकासुद्धां वेळ मिळत नाहीं. सगळा वेळ त्या कारभाऱ्यांच्या इथें. कारभारीणबाईचं माझ्यावांचून अगदीं चालत नाहींसं झालं आहे. मेजवान्याआजवान्या, कार्यप्रयोजनं, यांत कांहीं करायाचं झालं तर मी हवी. ( एके गालांत हंसून ) परवां कारभारीणबाई ह्मणत होत्या, कारभारी ह्मणतात कीं वेणूताईच्या हातचे जिन्नस जसे गोड लागतात, असे कुणाच्याच हातचे लागत नाहींत ! पुरुषांना जळ्ळी बायकांची प्रशंसा करायला हवी झालं !

**कृष्णाजीपंत**—अग ते उगीच ह्मणतात का? तूं तशीच सुगरण आहेस ! जिथें जावें तिथें तुझें सगळ्या तऱ्हेचें मला सहाय मिळतें, त्यामुळें बघ हें माझें शहाणपण

कसें जास्त उद्यास आलें आहे. बायको असावी तर अशीच असावी! जिकडे नवऱ्याचें लक्ष तिकडे तिची मनधरणी! सुगरण असें मी तुला उगीच ह्मणतों का? योग्यताच तुझी तशी आहे. शिवाय आज तुझ्या वयाला चाळीस वर्षें होत आलीं. पण आंगावर गोटतोड्यांसुद्धां सोन्यामोत्यांचे दागीने आणि ती झुपकेदार नथ घालून सजलीस ह्मणजे जणो सोळा वर्षांच्या पोरीसारखी दिसतेस! परवां कारभाऱ्यांच्या इथं दिवाळींत पक्कान्नें वाढीत होतीस, तेव्हां मीं हळूच लक्ष ठेविलें होतें. पंक्तींतील सगळी मंडळी तुझ्याकडे कशी टक लावून पाहत होती.

**वेणूबाई**—( नखऱ्यानें ) टोळ मेले! पुरुषांना जळ्ळी दांत विचकून बायकांकडे बघण्याची खोडच ती!

**कृष्णाजीपंत** ( तानांत येऊन बायकोच्या खांद्यावर हात टाकतो व प्रेमानें तिच्या हनुवटीला हात लावतो. )

**वेणूबाई**—( तोंड फिरवून ) जळ्ळं तें कौतुक! इश्श! (त्याचा हात झिटकारून) नको ती आतां लाडीगोडी! मला नाहीं आवडत हे असले चाळे! कैंस पिकले, मुलगे बरोबरीचे झाले, तरी मेला चावटपणा जात नाहीं हें काय? व्हा दूर!

**कृष्णाजीपंत**—अग, तूं रागाऊं नकोस; आपल्या ह्या गमतीच्या भाषणानें मला बघ प्रेमाची लहर आली. ( पुनः खांद्यावर हात टाकितो. )

**वेणूबाई**—अहारे सोंग! पुरे आतां. बरें पण मला सांगा अगोदर लवकरच जायचें होणार का? आणि आधीं जाणार कुठें?

**कृष्णाजीपंत**—लवकर ह्मणजे? उद्यांच निघणार. आधीं टिपूच्या लष्करांत जाऊन नंतर श्रीरंगपट्टणास जातों.

**वेणूबाई**—मग मला नाहीं का न्यायची बरोबर?

**कृष्णाजीपंत**—छेः ग, तुला बरोबर नेण्याचा हा समय का? तूं आपलें हें सगळें सामानसुमान, जिंदगी घेऊन तूर्त आपल्या माहेरीं जाऊन राहा. सर्व स्थीरस्थावर झाल्यावर मग कुठें असेन तिथें तुला मी नेईन.

**वेणूबाई**—( मिठी मारून ) तुह्मांला सोडून मी कशी राहूं? मला तें सुखास तरी कसं बरं पडेल? जरा मला कांहीं झालं कीं माझ्याजवळ रात्रंदिवस बसून परोपरीनं आपण माझी सुश्रुषा करितां! जळ्ळा मेला माझा रागीट स्वभाव! एखादे वेळीं मी रुसून मुसकुट मारून निजलें ह्मणजे नानातऱ्हेच्या आर्जवानं माझी मनधरणी करितां! तेव्हां गडे, तुह्मी गेल्यावर असं मला कोण जपेल बरं? पोटीं एखादी मुलगी असती तर तिनं आई आई ह्मणून काळजी तरी केली असती; हे दोघे मुलगे बाईलवेडे गुलाम! एवढालेसे आहेत, पण आतांपासून बायकांच्या नादीं! सुना तर त्या सुनाच! कशा ढालगज आहेत हें तुह्मीच पाहतां ना? तेव्हां तुह्मांवांचून मीं कसे दिवस काढावेत बरं गडे?

**कृष्णाजीपंत**—( कुरवाळून ) हें काय बरें? तूं अशी कष्टी होऊं नकोस. हें पाहून माझ्या पोटांत कसें भडभडून येतें!

**वेणूबाई**—( डोळ्यांत पाणी आणून ) मग मी कशी राहूं, सांगा बरं?

**कृष्णाजीपंत**—आतां तर मी मोठा फायदा करून घेण्याच्या कामगिरीवर जाणार, आणि जातांना तूं अशी रडूंरडूं करूं लागलीस, तर मला माझें कामकाज कसें सुचावें? ( तिचे डोळे पुसतो. )

**वेणूबाई**—( लाडुकपणानें ) बरं पण, पट्टणाकडे, हैसुरा-

कडे जवाहीर पुष्कळ मिळतं ह्मणून ऐकतें. मला पांच हजारांचा एक तनमणी जर आणून द्याल, तर मात्र— ( मुरकून तोंड फिरविते. )

**कृष्णाजीपंत**—हात्तेच्या! तूं वेडी तर नाहींसना? अग त्या रियासतींत मी शिरल्यावर तूं सोन्याला शिवूं सुद्धां नकोस! नुस्ता एक तनमणीच कां? सगळी तुला जवाहिरानेंच मढवून टाकतों परती!

**वेणूबाई**—बरं आह्मीं इथून गेल्यावर हें नुक्तं नवं बांधलेलं घर याची काय वाट?

**कृष्णाजीपंत**—( हंसत ) वेडीग वेडी! हा पट्ट्या पदरची शिवराई तरी खर्च करणारा आहे असें तुला वाटतें काय?

**वेणूबाई**—मग हें दुमजली घर फुकटच झालं का?

**कृष्णाजीपंत**—अग, सरकारांतून जेव्हां पागा व सदर हीं बांधण्याचे कारखाने सुरू झाले तेव्हां त्यांची देखरेख माझ्याकडे होती. त्या कारखान्यांचा मक्ता मीं आपल्या रामचंद्र नायकाला देऊन हें घर नुसत्या कारकुनींत बांधून घेतलें. पदराला खार? छेः!

**वेणूबाई**—मग त्या रामचंद्र नायकाला भराभर रुपये मोजून देत होतां ते? पांटीभर पैसा खर्च झालेला आहे का लक्षांत?

**कृष्णाजीपंत**—( मान डोलवीत ) भले! भले! तुला नाहींच का ठाऊक कसें करीत होतों तें?

**वेणूबाई**—नाहीं ह्मणून विचारतें.

**कृष्णाजीपंत**—अग, दुसऱ्याच्या देखत घराबद्दल सामानसुमान खरेदी करण्याकरतां ह्मणून हजारांच्या रकमा त्याच्या पदरीं घालाव्या, आणि नंतर त्यांचें त्यानें सोनें

खरेदी करून मुकाट्यानें रात्रीं मला लगडी आणून द्याव्या. देणं नास्ति घेणं नास्ति. मजकडे पुष्कळ रुपये सांचले होते त्यांचें मला विनबोभाट सोनें खरेदी करायचें होतें तें हें असें केलें ! ( खूब हंसतो ) या घराची इतकी कोण पर्वा करतो ? अग, जिथें जाईन तिथें घर तयार ! चला आतां आपण आपल्या तयारीस लागूं.

**वेणूबाई**—चला. ( उभयतां जातात )

**अंक दुसरा समाप्त.**

---

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला.

**स्थल**—सरकारवाड्यांतील सदर.

( संस्थानिक व्यंकटरावसाहेब भावे व काळोपंत प्रवेश करितात. )

**काळोपंत**—टिपूचा सरदार सैय्यद बुर्‍हानुद्दिन फौज घेऊन पुढें निघाला अशाबद्दल कृष्णाजीपंताकडून सावनूर मुकामचें पत्र आलें. त्याच्या अलीकडे आज दोन महिन्यांत त्याजकडील वर्तमान नाहीं. शत्रूची फौज काल नवलगुंदावर आली. शत्रु तर दाराजवळ येऊन ठेपला !

**व्यंकटराव**—फौज इकडे लौकर रवाना न व्हावी या संकेतावर कृष्णाजीपंतास इकडून पाठविलें आहे. त्याविरुद्ध हा प्रकार घडून आला एकूण ?

**काळोपंत**—असें तर झालें खरें.

**व्यंकटराव**—आप्पा, आतां विशेष भीति बाळगावयाला नको. कारण, पुण्याहून हुजूरची फौज गणेशपंत

बेहेरे यांजबरोबर निघाली असल्याबद्दल व परशुरामपंत भाऊ पटवर्धन हे श्रीमंतांचे आज्ञेप्रमाणें तासगांवाहून आमच्या कुमकेस येणार अशाबद्दल आपले गणेशपंत माटे वकील यांजकडून पुण्याहून लिहून आलेंच आहे. तेव्हां, जर शत्रु आंगावर आलाच तर लढाईचें तोंड सुरू करूं. इतक्यांत कुमक येऊन पोंचेल.

**काळोपंत**—नाना फडनवीसांनीं मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगीं या संस्थानचा अभिमान धरला.

**व्यंकटराव**—असा प्रसंग न समजतील तर पेशवे सरकारचें वर्चस्व या सर्व महाराष्ट्रावर कसें राहील ?

**काळोपंत**—खरें आहे.

**व्यंकटराव**—आप्पा, आपली तयारी कशी काय झाली आहे ?

**काळोपंत**—महाराज, दोन वर्षें जरी आपण एथें राहिलों तरी दारूगोळा व धान्य यांचा महामूर पुरवठा होण्याजोगता केला आहे. तोफा रोंखून तयार ठेविल्या आहेत. किल्ल्यावर व गांवच्या तटबंदीच्या बुर्जांवरून जागोजाग नाकेबंदी करून सर्व शिबंदी तयार राखली आहे. शिवाय बाहेरच्या सर्व फौजेचें आधिपत्य अमृतरावाकडे देऊन, त्याचे दिमतीस शेलकी शिलेदार मंडळी नेमिली आहे. यांणीं हिरेहाळ ओढ्यांतील बाभळीच्या झाडीचा आश्रय करून नवलगुंद रस्त्याचे रोखानें टेहेळणी करीत राहावें व शत्रूकडील येणाऱ्या टोळीवर छापा घालावा अशी योजना केली आहे.

**व्यंकटराव**—ही सर्व तयारी कडेकोट आहे यांत संशय नाहीं. परंतु गुदस्त सालीं पर्जन्यवृष्टि कमी झाल्या-

मुळें, खालच्या तळ्यांत व किल्ल्यावरील टांक्यांतून, पाण्याचा सांठा मुबलग झाला नाहीं. तेव्हां, आपल्या दहा हजार फौजेस, जनावरांस, व गांवांतील वस्तीस पाण्याचा पुरवठा कितपत होईल याची मला मोठी धास्ती पडली आहे.

**काळोपंत**—महाराज, पाण्याची टंचाई तर खरीच, परंतु चार पांच महिने पाणी पुरेल असा अजमास आहे. पुढें पावसाळा आलाच, तेव्हां पाण्याबद्दल विशेष काळजी करावयाला नको.

**व्यंकटराव**—चला, पेशव्यांची फौज कोठवर आली आहे याची बातमी आणविण्याची तजवीज करूं.

(सर्व जातात.)

---

## प्रवेश दुसरा.

**स्थल**—श्रीरंगपट्टण येथील दर्यादौलत बागेंतील महाल.

(टिपूसुलतान, वजीर व सरदार यांसहित बसला असतां कृष्णाजीपंत येऊन खुरनिस करून उभा राहतो.)

**मीरसादक वजीर**—बैठीये कृष्णाजीपंत. (कृष्णाजीपंत बसतो.) (टिपूकडे वळून) खुदावंद, बहमन् बहोत डरा हुवा है; लेकिन् दानिषमंद[1] है.

**कृष्णाजीपंत**—(टिपूकडे हात जोडून) सरकार, यासकट पांच सहा वेळ या पायांसमोर येण्याचा प्रसंग आला. तथापि मनांतील भीति मोडत नाहीं. कारण या गादीची कदरच तशी आहे! मोठमोठाले राजेरजवाडे, पेशवे निजाम सुद्धां, हुजूरचें नुसतें नांव ऐकून थरकाप होतात, मग

---

[1] दानिषमंद=पंडित; चतुर असाही अर्थ होतो.

मजसारख्या गरीब ब्राह्मणाची यावरून दशा उडणें यांत आश्चर्य नाहीं!

(हें ऐकून कुरेंपणानें टिपू मिशांवरून हात फिरवितो. वजीर व सरदार 'मुनासिब मुनासिब' ह्मणून माना डोलवितात.)

**टिपूसुलतान**—अच्छा कृष्णाजी, अब घबराव मत, फरागे[1] दिलसे बैठीये.

**कृष्णाजीपंत**—(हात जोडून) जो हुकूम.

**टिपूसुलतान**—क्यौं बदरी जमालखां, सैय्यद बुऱ्हानुद्दिनने नरगुंदपर फौज लेजाकर जंगेकी[2] कार्रवाई[3] भी शुरू की है सच, लेकिन् पेशवाकी फौज नरगुंदवालेकी मदतकेवास्ते पूनेसे रवाना हुई है. और नानाफडनवीस ऐसा लिखता है के "इस नरगुंदवालेका मरतबा बडा है. इसलिये उनको सब बातकी मदत करना हमको मुनासिब है. इसवास्ते आप नरगुंदपर भेजी हुई फौज वापस बुलवा लो. नही तो, आपकी और हमारी दोस्तीमे खलॅल[4] वाके होगा." देखीये, यहांतक नौबत पोहोची.

**बदरी जमालखां**—हुजूर, नानाके इस खॅरीतेका[5] मॅजमून[6] धमकी देनेका है. ये बात, खाविंदके खिंयाले[7] शरीफमे आई होगी?

**टिपूसुलतान**—हमारे खियालमे तो आचुका है. ले-

१ फराग=मोकळें, दिल=मन; फरागे दिलसे=मोकळ्या मनानें. २ जंग=लढाई; जंगकी=लढाईची. ३ कार=काम; रवाई=चालविणें. कार्रवाई=काम चालविणें. ४ खलल=बिघाड. ५ खरीता=थैलीपत्र. खरीतेका=थैलीपत्राचा. ६ मजमून=मजकूर, मतलब. ७ खियाल=ध्यान, शरीफ=मोठा. खियाले शरीफमे–थोरास आदबीनें 'आपल्या मोठ्या मनांत किंवा ध्यानांत' असें ह्मणण्याचा प्रघात आहे.

किन् इस पेशवाको हम् क्या समजते है ? इस दुनयांमे जिसकी शमशीर चमकती है ओही, खुदाकी कुदरतसे बादशाह बनता है. इसी तऱ्हे (तलवारीस हात लावून) ये हमारी शमशीर जिसने, इस जहांन्[1]को इस वक्त तसखीरे[2] किई है, उसके मुकाबिल कोई आसकेगा ? क्या मगदूर है ! नानाका मतलब मै पूरा जान चुका हूं. लेकिन् सय्यद बुऱ्हानुद्दिन ऐसे लिखते है के, "उस नरगुंदके अतराफ इस गर्मीकी—मोसम्[3] मे पानीकी बडी तंगी है. और अपनी फौज जिदर उतरी है उसके करीब[4] फक्त एक नाला बहता है; मगर, उसका पानी ऐसा तलख[5] है के जानवरभी पी नहि सकते हैं. क्यौंके अगर पेशवाके साथ लढाई करार पाई तो पानीके वास्ते इस् बडी फौजको और जानवरोंको बहुत तकलीफ[6] होगी. इसलिये फिलहाल ऐसी तदबीर करना चाहीयेके मोसमे बारिशके[7] आयेतक् जंग[8] मवकूफ रखा जाय. मगर, नाना फडनवीसको कुच और तदबीर[9]से उसवक्ततक गाफील रखना चाहीये.

**मीरसादक वजीर**—(टिपूस लक्षून) खुदावंद, कृष्णाजीपंत अगरचे नरगुंदवालेकी तरफसे वकालतके लिये

---

१ जहांन्=भूमंडळ, पृथ्वी; इस जहांन्को=या भूमंडळास अगर पृथ्वीस. २ तसखीर=पादाक्रांत. ३ मोसम=हंगाम, ऋतु, काळ; इस गर्मीकी मोसम् मे=या उष्ण काळांत किंवा उन्हाळ्यांत. ४ करीब=जवळ, लगत. ५ तलख=कडू. वर दर्शविलेल्या ओढ्याचें पाणी खारें असून कडवट असल्यामुळें सदर शब्दाची योजना केली आहे. ६ तकलीफ=त्रास, पीडा ७ बारिश=पाऊस, मोसमे=ऋतु, काळ. मोसमे बारिशके आयेतक्=पावसाळ्यापर्यंत. ८ जंग=लढाई. ९ तदबीर=युक्ति, तदबीरसे=युक्तीनें.

आया है सच; मगर हुजूरकी शानोशौकत[1] और हशमत[2] पर शेफ्ताँ[3] हुवा है और ऐसी उम्मेद रखता है के इसी सल्तनतमे[4] कोई खिद्मत बजालाये[5]. सो इसबाबतमें बंदेने बारहाँ[6] हुजूरमे गुँजारिश[7] की है. और इसी बाइस[8] इसवक्त उसको तलब[9] किया है. मुनासिब ये है के, उसीसे मशवेरत कीजीये, अलबत्ता वह् खैरखाहीसे कोई तजवीज लायख निकालेगा. क्यौं के वह् पेशवाई रियासत्का वाकफगारभी है.

**टिपू**—अच्छा, देखो कृष्णाजी, इसवक्त तुमको यहां किसवास्ते याद किया है ये कुच तुमारे खियाल मे आया है ?

**कृष्णाजीपंत**—नाहीं खुदावंद. लक्षांत कोठून येणार ? सरकारांनीं याद केली आणि आतांचे आतांच येण्याविषयीं हुकूम झाला आहे असें हुजूरांतील मिर्दा[10] गुलाम हुसेन याणें निरोप कळविल्याबरोबर, अपरात्रीची वेळ, इतक्या गडबडीनें कां बोलाविलें असावें, असे नानातऱ्हेचे तर्क मनांत येऊन सरकारचे भीतीनें अगदीं गर्भगळित झालों ! हातपाय लटपटूं लागले ! अशी दशा उडाल्यावर मग काय सुचणार आहे ? खावंद, इकडे यावें तर घोड्यावरून येववेना, तेंव्हां म्यान्यांत पडून आलों.

---

१ शान=थोरपणा. शौकत याचाही अर्थ तोच आहे. शानो शौकत=थोरपणा, दबदबा, भरभराट. २ हशमत्=थोरपणा, भरभराट. ३ शेफ्ता=भुलणें. शेफ्ता=भुलून गेला आहे. ४ सलतनत्=राज्य. ५ खिदमत बजालाये=नोकरी बजवावी. ६ बारहा=वारंवार, हमेषा. ७ गुजारिश=जाहीर करणें, अर्ज करणें. ८ बाइस=करितां; इसीवाईस=याकरितां. ९ तलब=बोलावणें. १० मिर्दा=हुजऱ्या.

**टिपूसुलतान**—खैर. अब सब अहवाल सुन लिया है; इस बारेमे[1] तुमारी सलाह क्या है बयान करो.

**कृष्णाजीपंत**—( हात जोडून ) जो हुकूम सरकार. हा वेळपर्यंत चाललेली सर्व हकीकत मीं ऐकून घेतली. नरगुंदकराचे मदतीस पेशव्यांची फौज रवाना झाली असल्याबद्दलचा मजकूर मलाही कळला आहे. आणि या दिवसांत नरगुंदचे आसपास पाण्याचा तोटा असल्यामुळें पावसाळ्यापर्यंत लढाई तहकूब ठेवावी असा सरकारचा इरादा असलेला मी समजलों. आतां यासंबंधानें मला सुचलेली हिकमत खावंदकदमापाशीं मी जाहीर करीन खरी; परंतु ती सरकारास कितपत पसंत पडेल याची मात्र मला भीति वाटत आहे.

**टिपूसुलतान**—जो तुमारे दिलमे आया होगा सो बफरागेखातीर[2] और बिलाखौफ[3] कहो.

**कृष्णाजीपंत**—सरकार, हल्लीं पुण्याची स्थिति बरी नाहीं. ती कशी ह्मणाल तर—नारायणराव पेशव्यास रावोबादादांनीं मारविल्यापासून कांहीं सरदार आणि मुत्सद्दी मंडळी नानाफडणिसाचे पक्षाकडे आणि कांहीं दादांच्या, अशी दरबारांत दुफळी माजली आहे. अशा संधींत नानाफडणिसास आपली फौज पुणें सोडून बाहेर गुंतविणें इष्ट नाहीं हें मला आंतून कळलें आहे. अशांत जरासें निमित्त मिळालें कीं नाना मदतीस धाडलेली आपली फौज माघारी घेईल. शिवाय त्या दरबारांत तूर्त पैशाचीही तंगी असल्याचें कळतें. याकरितां अशी युक्ति करावी

१ बारेमे=कामांत. इस बारेमे=या कामांत. २ बफरागेखातीर=मोकळ्या मनानें. ३ बिलाखौफ=न भितां.

कीं, हे नरगुंदकर बहुतेक प्रसंगीं या सरकाराशीं बेपरवाईनें वागत आले ह्मणून त्यांची नुसती खोड मोडावी इतकेंच आपल्या मनांत आहे असें नानास कळवावें, व पेशवे दरबारांतून नरगुंदकरास कोणत्याही प्रकारची मदत मिळूं नये या अटीवर पेशव्यांस भारी रक्कम देण्याचें प्रसंगास अनुसरून कबूल करावें आणि नानाकडे या बाबतींत सरकाराकडून बोलणें चालवावें. हा करार नानाफडणीस कबूल करीपर्यंत या सरकारची हल्लीं नरगुंदावर गेलेली फौज, सैय्यद बुऱ्हानुद्दिन यांणीं धारवाडावर घेऊन बसावें, आणि पेशव्यांची फौज हा प्रांत सोडून जातांच पाण्याबिण्याची अडचण न पाहतां पुनः सैय्यद बुऱ्हानुद्दिन यांणीं नरगुंदावर चाल करून किल्ल्यास वेढा देऊन संस्थानिकास किल्ल्यांत कोंडून टाकावें. किल्ल्यावर हल्लीं बेताचेंच पाणी आहे. महिना दोन महिन्यांत पाण्याच्या विपत्तीमुळें नरगुंदकर जेरीस येऊन पावसाळा सुरू होण्याच्या आधींच किल्ला आपल्या हस्तगत होईल. आणि पावसाळ्यापर्यंत जर आपण हें काम लांबणीवर टाकलें तर शत्रूस किल्ल्यावर पावसाळ्यांत पाण्याचा पुरवठा होईल. शिवाय तिकडील काळ्या रेगड रानांत पावसामध्यें सरकारचे फौजेस भारी तखलीफ प्राप्त होईल. हल्लीं नरगुंदकराची तयारी कितपत आहे, आणि सरकारच्या फौजेपुढें टिकाव धरण्याचा त्याचा दम किती आहे हें मी पूर्णपणें समजून व सरकारास होणाऱ्या सोई नीट लक्षांत आणून, कदमापाशीं विनंति केली आहे. ती बहुतकरून सरकारास पसंत पडल्यावांचून राहणार नाहीं.

**टिपूसुलतान**—( गंभीर मुद्रेनें मान डोलवीत ) ये कृष्णाजीकी राय[1] काबिले[2]यतिबार[3] है. क्यौं वजीर और बदरी जमालखां?

**मीरसादक वजीर**—ये बात बहुत ही मुनासिब है.

**बदरी जमालखां**—मैभी इस मतलबकू पसंत करता हूं.

**टिपूसुलतान**—देखो कृष्णाजी, इस वक्त तुमने बहोत उमदा मसलहत दी है, उसके सिले[4]ह्मे तुमकु कुच बकशीश देना हमारे नजदीक मुनासिब है. तुम आजके रोज म्यानेमे सवार होके हुजूरकी मुलाकातको आय हो, इस सबबसे तुमारे लिये आजसे म्यानेका लवाजिम[5] मिलेगा. और उस बाबत तन[6]खा जा[7]री करनेमे आयगी.

**कृष्णाजीपंत**—(मनांत) बीं तर रुजलें! (वजिरास उघड) रावाचा रंक व रंकाचा राव करण्याचें जेथें ईशसत्तेसारखें सामर्थ्य अशा या ( टिपूकडे लक्षून ) पायांची सेवा करण्याचा योग आपण आणिलात हें मी आपलें सुदैव समजतों. ( छातीस हात लावून ) आतां हा बंदा इमानें इतबारें आजन्म खिदमत करण्यास तय्यार आहे. मीं पुष्कळ दरबारें पाहिलीं, परंतु येथें जशी मनुष्याची कदर आहे अशी कोठेंच आढळत नाहीं. हा साक्षात् खुदाचाच अवतार तक्तनशीन झाला आहे.

---

१ राय=सल्ला, मसलत. २ काबिले=लायख, योग्य. ३ यतिबार=भरंवसा ठेवणें. काबिले यतिबार है=भरंवसा ठेवण्यास योग्य आहे. ४ सिलेह्=बदला. उसके सिलेहमे=याचे मोबदला. ५ लवाजिम=इतमाम. ६ तनखा=नेमणूक. ७ जारी=सुरू.

**टिपूसुलतान**—बिलफैल[1] जो मसलहत् ठेराई गयी है उस मुवाफिक तजवीज करना. इनशा[2] अल्ला हुताला हमारी फैतः[3] और नुसरत होगी!

**मीरसादक वजीर**
**बदरी जमालखां** —आमीन[4]! आमीन!

(सर्व जातात.)

---

## प्रवेश तिसरा.

**स्थल—व्यंकटरावसाहेबांचा दिवाणखाना.**

(संस्थानिक व्यंकटरावसाहेब व चंपा प्रवेश करितात.)

**व्यंकटराव**—चंपाताई, तुझ्या नवऱ्याची तारीफ किती ह्मणून सांगावी? अग पाहा, शत्रूकडील पांचशें स्वारांची टोळी अघाडीवर आली होती तिची अशी कांहीं त्यानें धुमाळी उडवून टाकिली कीं, परत शत्रूला जाऊन वर्दी कळविण्यास एक सुद्धां माणूस राहिलें नाहीं! शिवाय किल्ल्यासभोंवती मोर्चा बसविण्याची शत्रूची सारखी खटपट चालली असून जेथल्या तेथें त्या मोर्चावर छापा घालून त्यांना इतका सुद्धां थारा लागूं दिला नाहीं. शाबास आमच्या अमृतरावाची! रणसिंग घराणेंच तें, मग काय विचारावें?

**चंपा**—दादा, मुख्य या संस्थानच्या अन्नाचाच गुण असा आहे.

**व्यंकटराव**—शिवाय पाहा, एकूण एक शिलेदार

---

१ बिलफैल=तूर्त, हल्लीं. २ इनशा अल्ला हुताला=परमेश्वराचे इच्छेस आल्यास. ३ फतः=सिद्धि; नुसरत=जय. ४ आमीन=देवा आमचें मागणें कबूल कर अशा प्रार्थनेस मुसलमान लोक आमीन असें ह्मणतात.

मानकरी मंडळी शत्रूशीं निकरानें लढण्याची उमेद बाळगून मोठ्या जोमांत आहे. त्यामुळें शत्रूचें सैन्य जरी भारी आहे तथापि तें कसपटासारखें मला भासत आहे.

**चंपा**—दादा, पदरच्या माणसांना आपण तसंच प्रेमानं वागवितां, मग त्यांना कां बरं उमेद येऊं नये ?

**व्यंकटराव**—अग, असें नव्हे. नेहमी अशा प्रसंगांत निरढवलेलीं माणसें तीं; तेव्हां अर्थात् वेळेवर त्यांना स्फुरण यायचेंच. पाहा, शिकारीचीं कुत्रीं शिकारीकरतां रानांत नेलीं ह्मणजे तीं माणसांच्या हातांतून ओढ घेत केव्हां जाऊन सावजांवर पडूं, अशीं तडफडत असतात. तसें या लढणाऱ्या मंडळीला संग्रामाच्या प्रसंगीं वीरश्रीची हुरूप येते ! अग ताई, लढाईत गोळी व तलवारीची चमक चालू झाली ह्मणजे घोडींसुद्धां लगामेला ओढ देत नीट शत्रूवर चाल करून जातात समजलीस का ?

**चंपा**—दादा, हें आपलें बोलणं ऐकून मलासुद्धां या वेळेस असं वाटत आहे कीं पुरुषाचा पोशाख करावा, आणि घोड्यावर बसून माझ्या बाबांची तरवार ते वारल्यापासून म्यानबंद आहे ती घेऊन आपणां उभयतांबरोबर शत्रूशीं सामना करण्यास निघावंच !

**व्यंकटराव**—अग ताई, हें तुझें भाषण ऐकून यावेळेस तुझे वडील संताजीराव रणदिवेच मूर्तिमंत मजपुढें लढाईचें पाठबळ देण्याकरितां उभे आहेत असें वाटत आहे. शाबास बये शाबास !! मुलगा असो, किंवा मुलगी असो, 'बीजाप्रमाणें अंकुर' ही ह्मण खोटी नव्हे ! कारण तुझ्या आजोळाकडील व बापाकडील दोन्ही घराणीं शूर ! तेव्हां त्यांचा हा अंकुर (तिचे पाठीवर हात फिरवून) त्यांसारखा नि-

पजणें यांत नवल नाहीं. हें पाहा, कुलीन समानशील घराण्यांतून मुली देण्याघेण्याची जी परंपरा चाल चालत आली आहे तिचें कारण पुढें होणारी प्रजा आपल्यासारखी निपजावी हेंच होय. नाहींपेक्षां एखाद्या भिक्षुक, कुणबट, अगर वाणगट अशाच्या पोरीच्या तोंडांतून तुझ्यासारखे उद्गार कधीं निघाले असते का? जें तें आपापले कुळाकडे जातें. आतां तूंच पाहीनास? हा तुझा नवरा अमृतराव, याला हा लढाईचा पहिलाच प्रसंग असूनही जसा कांहीं अनुभवी योद्ध्यासारखा हें राजकारण जुंपल्यापासून अश्रांत श्रम करीत आहे!

**चंपा**—खरंच दादा, आतांशा बघा, त्यांना जेवण सुद्धां सुचत नाहीं. चार चार दिवस बांधलेली कंबर सोडीत नाहींत. परवां राणबा तोडकर ह्मणत होते कीं मागेंपुढें न पाहतां एकदम शत्रूंच्या टोळीवर तुटून पडतात. हें ऐकिल्यापासून, दादा, मला वाटतं कीं त्यांना पाठबळ द्यायाला त्यांच्याबरोबर आपण जावंच. दादा, मी जाऊं का?

**व्यंकटराव**—(हंसत) ठीकच. त्या बिचाऱ्याला पाठबळ देण्याला तुझ्याखेरीज दुसरें आहे का कोण? पण बुवा लग्न झाल्यापासून ही किती तरी अमृतरावाची काळजी!

**चंपा**—(लाजल्यासारखें करून) हें काय बरं दादा, असं ह्मटलं ह्मणून बहिणीची थट्टा करायची का?

**व्यंकटराव**—तर मग काय? दहा पंधरा भले भक्कम लोक नुस्ते त्याच्या पाठीवर ठेवले आहेत. शिवाय सगळी फौज. तेथें तूं जाऊन करणार काय?

(इतक्यांत अमृतराव येतो.)

**अमृतराव**—(मुजरा करून) महाराज, कांहीं महत्त्वाची खबर आहे.

**व्यंकटराव**—ती काय अमृतराव ?

**अमृतराव**—लढाई बंद करून फौजेनिशीं तूर्त धारवाडावर जाऊन राहावें असें सय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारास टिपूकडून लिहून आल्याचें वर्तमान आहे. किल्याभोंवतालचा मोर्चा उठवूं लागले आहेत. शिवाय बिनी तर धारवाडचे रोखानें निघाली.

**व्यंकटराव**—काय, लढाई बंद करून निघाले ? यांत काय मतलब असावा बरें ?

**अमृतराव**—श्रीमंतांची फौज आमच्या कुमकेस पुण्याहून निघाल्याची बातमी कळल्यावरून असें झालें असेल.

**व्यंकटराव**—असें जर ह्मणावें तर फौजा माघाऱ्या गेल्या असत्या. परंतु तूर्त धारवाडावर जाऊन राहण्यांत मतलब काय ?

**अमृतराव**—किंवा दुसरी कांहीं तरी मसलत चालली असावी.

**व्यंकटराव**—बरें, आपल्या कृष्णाजीपंताकडून या बाबतींत कांहींच कसें लिहून आलें नाहीं ?

**अमृतराव**—अशी महत्त्वाची बातमी लिहून न यावी याचें मलाही मोठें आश्चर्य वाटतें !

**व्यंकटराव**—असो, शत्रूचा मतलब कांहीं का असेना ? परंतु लढाई तूर्त तहकूब झाल्यानें पुण्याहून व तासगांवाहून फौजा येण्यास अनायासें अवकाश मिळाला.

( काळोपंत पेठे प्रवेश करितो. )

**काळोपंत**—महाराज, आनंदाचें वर्तमान आहे.

**व्यंकटराव**—तें काय बरें आप्पा ?

**काळोपंत**—( पत्रें हातीं देऊन ) महाराज, पुण्याहून हु-

जूरची फौज घेऊन गणेशपंत बेहेरे बन्नूरावर आले आहेत, आणि भाऊसाहेब पटवर्धन यादवाड मुक्कामावर आले आहेंत. दोन्ही फौजा आठ दहा कोसांच्या टप्यांत येऊन पोंचल्या.

**व्यंकटराव**—( पत्रें वाचून ) व्यंकटपतीच्या कृपेनें सगळ्या गोष्टी अनुकूल झाल्या. आतां कशाचीही काळजी राहिली नाहीं. हें वर्तमान ऐकून जरी शत्रूनें आपला मोर्चा धारवाडचे रोखानें फिरविला असला, तथापि आपल्यास सावधगिरी ठेविली पाहिजे. चला.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश चवथा.

**स्थळ**—नरगुंद शहरा बाहेर धारवाड रस्त्यावरील ओढा.

( गडबडीनें एक शिलेदार प्रवेश करितो. )

**शिलेदार**—( आपल्याशींच ) श्रीमंतांची फौज हा प्रांत सोडून परत जाऊन पंधरा दिवस सुद्धां झाले नाहींत, इतक्यांत आज दोन महिने धारवाडावर जाऊन राहिलेली शत्रूची फौज पुनः कां बरें इकडे आली असावी ? यावरून पुनः लढाईचा शत्रूचा मनसुबा निःसंशय असावा. पाहा, आह्मी टेहेळणी करीत आहों ह्मणून ही बातमी आपल्यास कळली. नाहींपेक्षां अकस्मात् किल्ल्यास वेढा पडलाच असता. बरें, आतां आपण ही बातमी आपल्या सरकारास लवकर कळवावी. ( निघून जातो. )

---

## प्रवेश पांचवा.

**स्थळ**—नरगुंदानजीक टिपूसुलतान याच्या फौजेचा तळ.

( सैय्यद बुऱ्हानुद्दिन आणि सय्यद गफूर प्रवेश करितात. )

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—( विवंचनेंत ) पेशवाकी फौज, हिकमतसे पिछे फिरादी बेहतर हुवा. नही तो बडी मुषकील होती. देखो, धारवाडसे फिर यहां आकर आज चार महिने गुजर गये; और किल्लेकें अतराफ बालूके बुर्ज वगैरा तय्यार करके बडी मेहनतसे मोर्चा भी बिठा दिया. लेकिन् तोफोंकी मार आधे पहाड तक् पोहोंचना मुषकील हुवा है. फिर ये किल्ला अपने हात कैसा आवे ? इस बातकी मुजको बडी फिकर है. या अल्ला !

**सैय्यद गफूर**—तकसीर ! इसवक्त किल्लेकी हालत किस वंजेकी[1] है ये खबर लाये बाद उस तौरकी तदबीर[2] की जाय.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—हां, इस बारेमें मैने कृष्णाजीपंतसे जिकर किया है. ओ कुच खबर लायेगा. लेकिन् मै समजता हूं के, एकदमसे फौज लेजाके किल्लेपर हमला[3] करना बेहतर होगा.

**सैय्यद गफूर**—सरकार, मगर तोफोंकी मार एकसा किल्लेपरसे जारी है. ऐसा होते, अगर किल्लेपर हमला करे तो हमलेमे फौजको बहोत नुकसान पोहोंचेगा. इसलिये मेरे रायनाखिसमे[4] ये आता है के चंदरोजे[5] इसी तौर

---

१ वजा=प्रकार, तऱ्हा. उस तौरकी=त्या प्रमाणें. २ तदबीर=युक्ति. ३ हमला=हल्ला. ४ राय=अक्कल. नाखिस=कोती. मेरे राय नाखिसमे=माझ्या कोत्या अकलेंत. ५ चंदरोज=कांहीं दिवस.

दुषमनको किल्लेपरही मुहासरेह्[1]मे रखकर मुसीबतोंसे[2] जेर करें तो, अपनी फौजको नुकसान न पोहोंचते खुद्[3]—बखुद्द किल्ला फतेह्[4] होजायगा.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—देखीये सैय्यद साहेब, जंगमे फौजकी नुकसानी देखनेकी जरूर नही है. मासिवाय इसके आप तो सराहतन देखते होके आदमी और जानवरोंके लिये पानीकी कैसी तंगी[5] है. और जानते होके, ये नरगुंदके जंगकी कारवाई जल्द तमाम[6] करनेके लिये बंदगाने आलीके[7] हुजूरसे कैसा सक्त फरमान[8] आया है. इसवास्ते बेहतर हैके, हमला हो. (इतक्यांत कृष्णाजीपंत येतो त्याला पाहून) पंत, क्या खबर है?

**कृष्णाजीपंत**—(एकीकडे) हल्लीं किल्ल्यावर संस्थानिकाचे हाल कोण्यापरी चालले आहेत ही माहिती यांस न देतां तें गूढ तसेंच राखून आपली कावेबाजी लढविली पाहिजे. तरच यांजवरही आपली चांगली छाप बसणार आहे. (उघड) सरकार, मी जेथपर्यंत येथें नव्हतों तेथपर्यंत आपण विचारांत पडलां होतां तें ठीकच. पण आतां पाहा, कशी करामत या पायांपाशीं करून दाखवितों ती!

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—जो चाहो सो हिकमत करो मुजायका नही. लेकिन् ये किल्ला जरूर फतह् होना चाहीये.

---

१ मुहासरेह्मे=गराड्यांत. मुहासेरह्मे रखकर–याचा अर्थ येथें गराड्यांत कोंडून ठेवून असा होतो. २ मुसीबत=त्रास. मुसीबतोंसे=त्रास देऊन. ३ खुद्द–बखुद्द=आपोआप. ४ फतह्=सर. ५ तंगी=कमताई. ६ तमाम=पुरतें, पुरें. ७ बंदगाने आली=टिपूसुलतान याचा किताब. ८ फरमान=हुकूम, आज्ञापत्र.

**कृष्णाजीपंत**—आपण काळजी सोडून द्यावी. मला टिपूसुलतान बहादूरांनीं येथें उगीच पाठविलें आहे काय? कशी खुबी करतों पाहा. जेणेंकरून आपल्या फौजेचें विशेष नुकसान तर न व्हावें आणि किल्ला तर हातीं यावा.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—(डोळे मिटून) सुभानल्ला[1]! (कृष्णाजीपंताकडे) वाहवा! शाबास पंत! आप दाना[2] हो, इसमे कुच शुबा[3] नही.

**सैय्यद गफूर**—बेशक! बेशक!

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अब चलीये.

(सर्व जातात.)

---

## प्रवेश सहावा.

**स्थल**—कृष्णाजीपंत उतरलेली जागा.

(कृष्णाजीपंत प्रवेश करितो.)

**कृष्णाजीपंत**—(आपल्याशींच) प्रसंग पडेल तसें वागावें हें जें आपलें तत्व त्यास अनुसरून आपली वागणूक चालली आहे. त्या पक्षीं दिवसेंदिवस आपली योग्यता वाढत जाणार हें निःसंशय! आजपर्यंत आपण या नरगुंदांत नरगुंदकरांचे ताबेदार होऊन त्यांचें हित पाहात होतों, परंतु आतां टिपूसुलतान बहादूर यांचे ताबेदार बनलों त्या अर्थीं टिपूचेंच हित पाहणें अवश्य! तेव्हां, हल्लीं हा किल्ला टिपूच्या हस्तगत होण्याविषयीं तोरगलच्या काजीस किल्ल्यावर संस्थानिकांकडे मध्यस्थीस पाठवून आज चार पांच दिवस मोठ्या खटपटीनें जी आ-

---

१ सुभानल्ला=देवाचें नांव घेणें. (आश्चर्याचे वेळीं). २ दाना=चतुर. ३ शुबा=शंका, संशय.

पण मसलत ठरवून ठेविली आहे ती आतां शेवटास नेली पाहिजे. चमत्कार असा आहे कीं, मनुष्य मेटीकुटीस आल्यावर आपोआप बेतावर येतें. किल्ल्यावर पाणी असतें तर हे नरगुंदकर ऐकते का? परंतु बिचारे करतात काय? तसलें तें खराब पाणी पिऊन हगवणीच्या आजारानें त्यांचीं हजारों माणसें प्राणांस मुकलीं! सगळ्या फौजेचा फडशा उडाला! कोण हाल! कोण विपत्ति! "भीक नको पण कुत्रें आवर" अशी त्यांची स्थिति झाली ह्मणूनच त्यांनीं आपलें बोलणें ऐकिलें. बोलणें ऐकिलें खरें, पण त्या करारांत एका गोष्टीची मोठीच भानगड राहिली. हे आपल्या राहिल्यासाहिल्या फौजेसहित हत्यारांनिशीं किल्ला उतरून जाऊं ह्मणतात; परंतु टिपूचा सरदार तसें कबूल करणार नाहीं, कारण मुळांत त्यानें ज्या अटी सांगितल्या आहेत, त्यांचें धोरणच तसें आहे. तेव्हां हत्यारांसहित जाण्याचें जें बोलणें आहे तें, तोरगलकर काजीसाहेब यांच्या ह्मणण्याप्रमाणें आपण मोघमांत ठेवावें. हे काजीसाहेब याकामांत मुख्य मध्यस्थ आहेतच. तेव्हां त्यांजकडून, नरगुंदकर किल्ला उतरून जाण्यास कबूल आहेत, इतकेंच सैय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारास सांगवावें ह्मणजे आटपलें. आतां हे नरगुंदकर किल्ला उतरून जातांना हत्यारांबद्दल कटकट होऊन यांचा व टिपूकडील लोकांचा सामना होणार! होईना? त्यांत परिणामीं नरगुंदकरांचाच समूळ नाश होणार हें उघड आहे. या हत्यारांचे संबंधानें पुढें जिकीर बहुतकरून निघणार नाहीं, जरी निघाली तरी नरगुंदकरांनींच आयत्या प्रसंगीं करार बदलला असें ह्मणतां येईल. त्यावेळेस माझें व काजीचे

ह्मणण्याचे उलट नरगुंदकरांच्या तर्फदारीनें बोलणार आहे कोण ? (हंसतो) एकंदरींत सैय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारापुढें किल्ला स्वाधीन करून देववूं हें जें मी आणि काजी बोललों आहों, तें बोलणें कशाही युक्तीनें पार पाडूं ह्मणजे झालें. आपण आतां काजीसाहेबास घेऊन सैय्यद बुऱ्हानुद्दिन सरदाराकडे जावें, आणि त्याला हा मजकूर कळवावा. उद्यां नरगुंदकर किल्ला उतरून गेले, आणि टिपूच्या सैन्यानें किल्ला हस्तगत करून घेतला ह्मणजे गंगेंत घोडे न्हाले ! चला. (जातो.)

## अंक तिसरा समाप्त.

---

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—किल्ल्यावरील वाड्यांतील सदर.

(संस्थानिक व्यंकटरावसाहेब बसले असतां काळोपंत व अमृतराव प्रवेश करतात.)

**व्यंकटराव**—(चिंतेनें) शेवटीं हा किल्ला सोडून जाण्याचा प्रसंग आला ना ? हर ! हर !! पणजे रामराव, आजे दादाजीराव, वडील भास्करराव, यांनीं आपल्या बाहुपराक्रमानें या संस्थानच्या संबंधानें जें ऐश्वर्य आणि जी कीर्ति आजपर्यंत मिळविली, तिचा शेवट अशा तऱ्हेनें माझ्या कारकीर्दीत व्हावा काय ? प्रथम हें शरीर जाऊन नंतर हा किल्ला गेला असता तर हें दुःख भोगण्याचें नशिबीं कां येतें ? देवा व्यंकटपती, माझ्या पूर्वजांप्रमाणें मी तुझ्या सेवेंत तत्पर असतांही तूं माझा कंटाळा कां बरें के-

लास ? परमेश्वरा, तूं स्वर्ग, मृत्यु, पाताळ या त्रैलोक्याचा स्वामी ह्मणून तुझें त्रिपति हें नामाभिधान पुराण व वेद यांनीं गाइलें आहे. हा एवढा तुझा अधिकार असून, तुझ्या या दासास तो नीच यवन या प्रहर चार तासांत तुझ्या देखत जिंकून, तूं दिलेलें ऐश्वर्य हरण करून, आणि तूं दिलेली प्रतिष्ठा मातीस मिळवून टाकणार तर त्याचें पारिपत्य तूं कां करीत नाहींस ? नारायणा, तूं भक्तवत्सल हें ब्रीद धारण केलें असून या प्रसंगीं तूं आपल्या भक्ताचें रक्षण करण्यास कां तयार होत नाहींस ?

**काळोपंत**—भवितव्यतेप्रमाणें सर्व कांहीं गोष्टी घडून आल्या आहेत. कारण पाहा, टिपूची चाळीस लाख रुपयांची नजर कबूल करून आमचे मदतीस पाठविलेली फौज नाना फडनविसांनीं परत बोलवावी काय ? शिवाय, हा आषाढ मास असूनही एक थेंबसुद्धां पावसाचा नाहीं ! त्यानें जर कृपा केली असती तर आज पांच महिने जशी टक्कर दिली तशी पांच वर्षें देत राहिलों नसतों काय ?

**व्यंकटराव**—आप्पा, काय करूं, या हगवणीच्या उपद्रवानें माणसें मरूं लागलीं व तो मरवडा माझ्यानें पाहवेना, ह्मणूनच निरुपायानें हा किल्ला उतरून जाण्याचा करार कबूल करणें भाग झालें !

**काळोपंत**—होय महाराज, दैव प्रतिकूल झालें ह्मणजे अशा चोहोंकडून अडचणी येतात ! तथापि धैर्य सोडून उपयोग नाहीं. कराराप्रमाणें आपल्या राहिल्यासाहिल्या लोकांस हत्यारांनिशीं घेऊन पार होऊन तर जाऊं. पुढचें पुढें पाहतां येईल.

**अमृतराव**—महाराज, काळजी करूं नये. मागें

जसा आपल्या पूर्वजांनीं मोंगलांकडून किल्ला परत हिसकावून घेतला तसा पुनरपि या टिपूकडून घेतां येईल.

**व्यंकटराव**—तर मग ठरल्याप्रमाणें किल्ला सोडून जावें ह्मणतां काय?

**काळोपंत**—होय महाराज, जाणें भाग आहे.

**व्यंकटराव**—शत्रूचा नेम काय? करार बदलून हत्यारांसहित जाऊं देण्यास अटकाव करतील तर पुढें काय करणार?

**अमृतराव**—होय महाराज, हा टिपू प्रसंगीं बदलत असतो असें मी ऐकतों.

**काळोपंत**—मग होईल तें होवो हत्यारांशीं आणि आपल्या प्राणांशीं गांठ ठेविली पाहिजे.

**व्यंकटराव**—ठीक आहे. आपल्या सर्व लोकांस अशी ताकीद करावी कीं, हत्यारांस शत्रु प्रतिबंध करतील आणि आपलें निशाण घेऊं लागतील तर एकदम तुटून पडून शत्रूंची कत्तल उडवावी.

**अमृतराव**—आज्ञा महाराज, ताकीद करतों.

**व्यंकटराव**—आप्पा, घरच्या मंडळीची व्यवस्था आपण प्रथम लाविली हें बरें झालें.

**काळोपंत**—होय महाराज, परंतु आईसाहेब व वहिनीसाहेब वगैरे मंडळीबरोबर चंपा न जातां हट्ट घेऊन येथेंच राहिली आहे.

**व्यंकटराव**—काय ह्मणतां चंपा नाहीं गेली?

**काळोपंत**—नाहीं महाराज.

**व्यंकटराव**—बोलवा तिला इकडे. (चंपा आंतून येते) चंपाताई इकडे अशी पुढें ये.

**चंपा**—काय दादा?

**व्यंकटराव**—बया, आह्मी या वेळेस कशा संकटांत पडलों आहों हें तुझ्या लक्षांत नाहीं काय? अग, बायका माणसें आमच्याबरोबर राहिल्यानें कदाचित् त्यांचा परिणाम नीट लागणार नाहीं हें जाणून सर्वांची रवानगी नांदणीकडे केली, त्यांबरोबर तूं कां बरें गेली नाहींस?

**चंपा**—दादा, ज्या संकटांत आपण पडलां आहांत त्यांची विभागीण होण्याकरतांच आई व वहिनी यांजबरोबर न जातां बुद्ध्या या पायांपाशीं मी राहिलें आहें.

**व्यंकटराव**—लढाईच्या प्रसंगीं येणारीं संकटें पुरुषांनींच भोगावींत. त्यांचा वांटा स्त्रीजातीस देणें योग्य नाहीं; तर बाळे, आतां तरी तूं लवकर चालती हो. बरोबर माणसें देतों.

**चंपा**—नाहीं नाहीं, मी कदापि जाणार नाहीं! दादा, लढाईच्या प्रसंगांत स्त्रिया जर पुरुषास पाठबळ देण्याकरितां धैर्यानें सज्ज होऊन राहतील तर, पुरुषांचें बळ दुणावणार आहे. आपण माझे पालनपोषण करणारे अन्नदाते धनी तर खरेच, शिवाय आपण मला आपली बहीण मानली आहे, याकरितां आपलें आणि ज्यांच्या पदरीं मला घातलें आहे त्या (अमृतरावाकडे बोट करून) माझ्या प्रियपतींचें सहाय करण्याकरितां हा मी आपला देह आणि प्राण अर्पण करण्याचा निश्चय करून राहिलें आहें. तर दादा, मला आपल्याजवळ ठेवून घ्या, आणि लहानपणीं पट्टा खेळणें, बंदुकीचें निशाण मारणें वगैरे जें कांहीं मी तुमच्याबरोबर शिकलें आहें, तें घरीं राहून मेल्यावर मातींत न घालवितां, आपल्या उभयतांचे पायां-

जवळ राहून प्रसंग पडल्यास त्याची कशी चीज करून दाखवितें पाहा ?

**व्यंकटराव**—खरं बाळे, परंतु, तूं सर्वदा आपल्या भाच्यास खेळविणारी, कडेवर घेऊन हिंडणारी, त्यामुळें तो तुझ्या संवयीचा झाला आहे. तो तुजवांचून कसा बरें राहील ? तसेंच आईसाहेबांस तुजविना कसें करमेल आणि घरांत तरी कसें चैन पडेल बरें ? तर बये, या सगळ्या गोष्टी लक्षांत आणून त्यांच्याकडे तूं जाच; दुराग्रहानें आमच्याजवळ राहूं नकोस.

**चंपा**—( डोळे पुशीत ) दादा, माझ्या प्राणांपेक्षां अधिक आवडत्या आई व प्रिय वहिनी किल्ल्यावरून खालीं जातांना लाडक्या बाळास—माझ्या आवडत्या आप्पासाहेबांस—कडेवर घेऊन मेण्याजवळ उभ्या होत्या; त्या दोघींचे डोळ्यांतून एकसारखे पाण्याचे लोट चालले होते; कंठ दाटून आल्यामुळें त्यांच्यानें माझ्याशीं बोलवेना, आणि माझीही दशा तशीच होऊन, त्यांच्याशीं माझ्यानें बोलवेना. अशा स्थितींत "बाळे, तुला कशी ग सोडून जाऊं ?" ह्मणून दोघींनींही माझ्या गळ्याला मिठी घातली, व माझा तान्हा, चिमुकला, माझा प्रिय आप्पा, वहिनीच्या कडेवरून 'आत्या आत्या' ह्मणून मजकडे ओढ घेऊं लागला. त्या वेळेस माझ्या लाडक्याच्या डोईची टोपी एका डोळ्यावर सरकून उन्हानें माझ्या बाबाचा चेहेरा लाल झाला होता. तेव्हां त्याचें तें गोजिरवाणें तोंड, आणि आई व वहिनी यांची दीनवाणी मुद्रा, हें सर्व पाहून, दादा, त्या प्रसंगीं माझे अंतःकरणास किती दुःख झालें असेल याचा विचार आपणच करावा ! ( डोळे पुशीत ) दादा, हा दुःखाचा दे-

खावा माझ्या डोळ्यांसमोर असतां वारंवार माझ्या मनावर मोहाचें जाळें पडूं पाहत असे. तथापि त्या वेळेस विचारानें तें सर्व एकीकडेस झुगारून आई व वहिनी यांच्या विनवणीकडे लक्ष न देतां पाषाणासारखें अंतःकरण करून आपल्या सेवेंत राहण्याच्या निश्चयानें राहिलें असतां, आई, वहिनी, व चिमुकला आप्पा यांचें मला पुनः स्मरण करून, दादा, माझें मन तुह्मी व्यर्थ कां बरं मोहांत पाडतां?

**व्यंकटराव**—बया, यावरून आईस तूं कठोर मनाची आहेस असें वाटलें नसेल का?

**चंपा**—दादा, वाटलं असेल, पण काय करूं? एकीकडे आड आणि एकीकडे भरलेली नदी, अशीं दोहोंकडून सारखीं संकटं आलीं. तेव्हां काळजीच्या आडांत कुचंबून मरण्यापेक्षां नदीच्या प्रवाहांत आपले उभयतांचे हात धरून गेल्यानें दैवाची नाव आपल्या पुण्याईनें मिळाल्यास सर्व पार होऊन जाऊं; नाहींपेक्षां, आपल्या व प्राणवल्लभांच्या संगतीं धारातीर्थीं मिळणारे स्नानाचे लाभानें देवाजवळ अक्षयी पद प्राप्त होईल, ही अपेक्षा करून राहिलें आहें. तर दादा, मला मागें न ढकलतां माझी बहिणीची हौस या वेळीं आपण पुरविली पाहिजे!

**व्यंकटराव**—शिव शिव!! अशा तऱ्हेनें बहिणीची हौस पुरविण्याचें माझे नशीबीं आलें ना? अमृतराव, या वेळेस मला कांहीं सुचत नाहीं! तुह्मी तरी हिला दोन गोष्टी समजून सांगा.

**अमृतराव**—महाराज, आपल्या सांगण्यापेक्षां माझें सांगणें विशेष आहे असें नाहीं. तथापि आज्ञा झाली त्या अर्थीं सांगतों. (जरा रागावून) हा काय ग तुझा

हेकडपणा ? दोन तास सारखे महाराज तुझी विनवणी करीत असून त्यांचे शब्दास मान न देतां व्यर्थ दुराग्रह धरून बसली आहेस ? वेडे, आह्मी सुरक्षित किल्ल्यावरून पार होऊन जाऊं ह्मणण्याचा नेम नाहीं व प्रसंग आल्यास कत्तल उडण्याचा संभव आहे ! हें पक्कें समजून यजमानांनीं सर्व बायका मंडळींची रवानगी निराळ्या मार्गानें करून दिली आहे. तुझ्या राहण्यापासून तशा बिकट प्रसंगीं सर्वांस त्रास मात्र होणार आहे. तर अद्याप अवधि आहे तों लवकर निघून चालती हो कशी !

**चंपा**—( जवळची तलवार हातीं घेऊन ) प्रिया, हें सगळें मनांत आणूनच मी आपल्याबद्दल कोणासही त्रास न व्हावा याकरितां डाव्या मुठींत जीव आणि उजव्या हातीं हें शस्त्र घेऊन शत्रूस दोन हात दाखविण्यास व प्रसंगीं येणारा परिणाम भोगण्यास तयार होऊन राहिलें आहें !

**अमृतराव**—( जास्त रागावून ) छी: वेडे, रणांत शिरण्याचें काम बायकांचें का आहे ? एकदम निघून चालती हो कशी ? खबरदार एथें आतां राहशील तर !

**चंपा**—प्रिया, लग्न झाल्यापासून आजवर एक घांस जर घेऊं लागलां तर प्रथम प्रीतीनें माझ्या तोंडांत घालून मग आपण ग्रहण करीत असां; असें असून आतां स्वामिकार्याचा वांटा मला न देतां त्याचें सर्व श्रेय आपण एकटेच घेऊं पाहतां काय ? असा हा आपलपोटेपणा आपण केव्हांपासून शिकलांत बरें ? जरी या प्रसंगीं आपण इतके कठोर झालां आहां, तथापि मी आपली अर्धांगी, याकरितां आपण जें आतां स्वीकारणार आहांत त्याचा वांटा

घेतल्यावांचून कधींही राहणार नाहीं ! प्रिया, आपण साधारण बायकांत माझी गणना करतां काय ? ( ईर्षेनें ) या महामत्तगड किल्ल्यासाठीं आणि या धन्याचे मिठाकरतां हलाल झालेलें जें रणदिव्यांचें घराणें त्या घराण्यांतील शूर संताजीरावाचा हा अंकुर आहे. तर मी आपल्या बापासारखें आपलें नांव गाजविल्यावांचून कदापि राहणार नाहीं. आणि जर या कृत्यास आपण मला विन्मुख करूं इच्छीत असाल तर पाहा ! तसें नाहीं तर अशा रीतीनें हा माझा देह आपल्या उभयतांचे पायांवर अर्पण करितें ! घ्या ही दासीची सेवा. ( असें म्हणून तलवार मानेवर ठेविते ती वरच्यावर व्यंकटराव धरतात. )

**व्यंकटराव**—हाय हाय ! ! ही आतां जिवावर उदार झाली आहे ! हिला बोध करणें व्यर्थ आहे. याकरितां हिला पुरुषाचे पोशाखानें आपल्याबरोबर घ्यावी. पुढें हत्यारांबद्दल शत्रूची आमची कदाचित् लढाई जुंपल्यास ही बायको असें ओळखून हिजवर कोणी हत्यार चालविणार नाहींत, व नंतर देव बुद्धि देईल तसें करतां येईल. ( चंपा आंत जाऊन पुरुषाचे पोशाखानें हत्यारबंद बाहेर येते. )

**काळोपंत**—महाराज, आज्ञेप्रमाणें व्यंकटेशाची मूळ मूर्ति सोमापूरचे रानांत पुरून ठेवून, ही श्रीनिवासमूर्ति बरोबर नेण्याची पुजाऱ्यांनीं आणिली आहे.

**व्यंकटराव**—( मूर्ति हातीं घेऊन ) देवा ! आह्मांबरोबर तुलाही क्लेश भोगणें आलें ना ? ( मूर्ति काळोपंताकडे देऊन ) आप्पा, ही माझ्या पाठीवर बांधा. ( बांधतात. )

**काळोपंत**—चलावें महाराज; छत्रपति सरकारचे

निशाणासहित भवानीचें दर्शन घेऊन निघूं आतां. (भवानीचे देवळापुढें येतात.)

**व्यंकटराव**—(देवीपुढें उभे राहून) आई भवानी, तूं या प्रसंगीं आमचा कंटाळा केलास खरा. तथापि आह्मी पुनः तुझी सेवा करावी ही ईर्षा बाळगून जात आहों. तर जगदंबे, ज्या छत्रपति महाराजांनीं तुझी या ठिकाणीं स्थापना केली त्या प्रभूचें (निशाणाकडे हात करून) हें निशाण आहे. याचा अभिमान तुला असावा. निघा, चला. (चालूं लागतात.)

**अमृतराव**—(किल्ल्याच्या तटाकडे जाऊन) महाराज, इकडे पाहा, शत्रूचें सैन्य वर चढून येऊं लागलें आहे. निम्मा डोंगर चढलेंच.

**काळोपंत**—उतरावें महाराज, आमचे लोक निम्म्यावर खालीं उतरून चालूं लागले आहेत.

**व्यंकटराव**—चला, उतरा. (चालूं लागतात.) आपलें निशाण आणि हत्यारें संभाळा. आपले सर्वांचे प्राण जातील तेव्हांच शत्रूचे हातीं हा बावटा लागणार आहे. हरहर महादेव!

**अमृतराव**—आपण आतां दोन दरवाजे उतरून आलों. तिकडे पाहा, शत्रूकडील लोक आपल्यांत मिसळलेसे दिसतात.

**व्यंकटराव**—(खालीं पाहून) आपल्या आणि शत्रूचे लोकांत बतेरीच्या चौकीजवळ कांहीं गडबड चालल्यासारखी दिसते. आपण लौकर जाऊन त्यांस मिळूं. जय काली! हरहर महादेव!

(पड्यांत) दीन[1]! दीन! जबरदस्तीसे हत्यार लेना.
(पुनः) दीन! दीन!

(पड्यांत) देखो, लाल बावटेके साथ जो लोग आ रहे हैं उनूपर किसी किस्मका[2] हतियार मत चलाव. शायद[3] ओही संस्थानके मालक और उनके सरदार होंगे. इनू लोगोंको सुलतान बहाद्दरके हुजूर सिपुर्द करनेका है. जिंदा[4] गिरिफतार[5] करो. संभालो, मत् मारो. बाकी लोगोंको कतल करो. ओहो! ये लोग बेखौफ[6] चले आये हैं. (दीन दीन व हरहर महादेव या शब्दांचा मोठ्यानें गजर होतो.)

---

## प्रवेश दुसरा.

### स्थळ—नरगुंद किल्यावरील सदरेपुढील पटांगण.

(सैय्यद बुऱ्हानुद्दिन व सैय्यद गफूर हे धापा टाकीत कांहीं लोकांसहित प्रवेश करितात.)

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—ओहो! ये कैसे मारे गये. तोबा! तोबा!! कुच बोला नहि जाता. खैर! संस्थानके मालिक और उनके नजदीकके लोगोंको कुच नुकसान नही पोहोंचा. मगर, जिंदा गिरफतार करलिये ये बडी बात हुई. जैसा मुकैयद[7] शेर[8] छूटे बाद दिलावरीसे[9] तूट पडता है, वैसाही इनू लोगोंने हमला किया. शाबास! शाबास!

---

१ दीन=लढाईत वीरश्री येण्यास उच्चारण्याचा मुसलमान लोकांचा शब्द. २ किस्म=तऱ्हा. किसी किस्मका हतियार=कोणत्याही तऱ्हेचें हत्यार. ३ शायद=बहुतकरून. ४ जिंदा=जिवंत. ५ गिरफ=धरणें; गिरफतार करो=धरा; कैद करा. ६ बेखौफ=न भितां किंवा निःशंक. ७ मुकैयद=कोंडून ठेविलेला. ८ शेर=वाघ. ९ दिलावरीसे=धैर्यानें.

**सैय्यद गफूर**—सिपाहीका हतियार जबरदस्तीसे लेना बहुत मुषकिल है. इसवास्ते उन् लोगोंको तहव्वूर[१] पैदा हुवा.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—वे हत्यारबंद होके बावटे समेत जाने लगे तब उनपर हमला करना जरूर हुवा. लेकिन् उन्होंने बडी जवान्मर्दी[२] दिखायी.

**सैय्यद गफूर**—बेशक जवान्मर्दी है, इसमे कुच शुबा नही. तकसीर, आप जानते होके आजतक अतराफमे[३] हमने मोर्चाबंदी करनेके लिये बहुतही कोशीश की. लेकिन्, किसी दिन् कोई जाय अपने कबजेमे आने न दी.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—सच है. देखीये सैय्यद साहेब, जिसवक्त संस्थानके मालिक और उनके नजदीकके लोगोंकों गिरफ्तार करनेकेवास्ते हमने घेर लिया उसवक्त उनकेपास एक छोकरा बिलकुल कमसिन्[४] मालूम होताथा. अलबत्ता उसकी उमर पंधरा बरसकी होगी. इस छोकरेने तलवार उठाकर गाझीके[५] मानिंद और बिजलीके मुवाफिक चमकाता हुवा खुद मुझपर चला आया. ओहो! उसकी खूबसूर्तीकी तारीफ मै क्या बयान करूं? जो उसकी तलवार मेरी गर्दनपर लगनेवाली थी, वो गोया मेरे

---

१ तहव्वूर=ईर्षा. २ जवान्मर्दी=मर्दुमकी. ३ अतराफमे=सभोंवार. ४ कमसिन=अल्पवयी. ५ गाझीके मानिंद=मुसलमान नव्हे अशास मारून जे विजयी होतात त्यांस गाझी अशी संज्ञा आहे; तसेंच लढाईंत चढ करून जाणारासही गाझी ह्मणण्याचा प्रघात आहे. ह्मणून येथें गाझी=वीर, मानिंद=सारखे. गाझीके मानिंद=वीरासारखा असें ह्मटल्यास चालेल.

कलीजेपर कारगर[1] हुवी है! शुकेरे[2] खुदा उस बिचारेको किसीने नही मारा!

**जमालखा**—खुदावंद जब मैने उस लडकेसे हत्यार छिनलिया, तब उसके हात रेशीमके मुवाफिक् मुझको नरम मालूम हुये. और उसकी छाती उभरी नजर आई. ये बात तमाम खियालमे लाया हूं. इस परसे ओ औरत होगी ऐसा मैं समजता हूं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—क्यौं सैय्यद साहेब? ये जमालखांकी वातपरसे उस लडकेकी मर्दुमियतकी[3] बाबत बडा अंदेशा पैदा होता है! खैर, उसकी तजवीज हिकमतसे करनी चाहीये.

**सैय्यद गफूर**—जनाब, ये हकीकत अछी तऱ्हासे कृष्णाजीपंतसे जाहीर होगी?

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बेहत्तर है. देखीये सैय्यद साहेब, आपने अब संस्थानवालेपर पहरा वगैरा नेहायत बंदोबस्तीसे रखना, और ओ लडका औरत है इस बाबतकी खातिरजमई कृष्णाजीसे करलेना, फिर उसको संस्थानवालेके महलमे सुबुह्को[4] लेना.

**सैय्यद गफूर**—बहोत अच्छा! जो हुकूम.

(सर्व जातात.)

---

१ कारगर=शिरणें. गोया मेरे कलीजेपर कारगर हुवी है=माझ्या काळजाचा भेद केल्यासारखें झालें आहे. २ शुकरे खुदा=देवाचा उपकार मानतांना असें ह्मणतात. ३ मर्दुमियत=पुरुषपणा. मर्दुमियतकी बाबत पुरुष असल्याबद्दल. ४ सुबुह्को=सकाळीं.

## प्रवेश तिसरा.

**स्थळ**—नरगुंद येथील सरकारवाड्यांतील सदर.

( सैय्यद बुऱ्हानुद्दिन बसला असतां कृष्णाजीपंत व सैय्यद गफूर चंपासहित प्रवेश करितात. )

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बैठीये सैय्यद साहेब; पंत, आप बैठीये. ( सर्व बसतात. चंपा बाजूस उभी राहते. )

**सैय्यद गफूर**—जनाब, मैने संस्थानवालेको उनके लोगोंसमेत सोमापूरमे आरब लोगोंके पहरेमे रखवादिया. और जो उनके साथ औरत थी, उसको यहां लायाहूं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बहोत खूब! सैय्यद, देखो के सलतनतका बावटा किलेपर चढाके तोपोंकी सलामी दी है. अलहम्[1] दुलिल्लाह! सुलतान बहाद्दरकी गादीकी सलामती ऐसी ही है. ( कृष्णाजीकडे ) अजी पंत, अब् गिरफ्तार हुये सो लोग कौन है उसका नाम वगैरा सब बयान कीजिये.

**कृष्णाजीपंत**—जो हुकूम. जे वयानें लहान, बावीस तेवीस वर्षांचे, अंगानें सडपातळ तेच संस्थानचे मालक व्यंकटरावसाहेब भावे, आणि अंगानें कांहींसे जाड असून शरीराचा बांधा पीळदार, जरा ठेंगणे, मुद्रा क्रूर, जरा उतारवयाचे आहेत तेच संस्थानिकांचे कारभारी काळोपंत आप्पा पेठे.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—जब ये कतल हो रहाथा तब मैने खूब खियाल कियाके, काळोपंतकी सूरतसे उसकी हिंमत जियादह् थी. और येही शक्स[2] इस लढाईका बानी[3]

---

१ अलहम् दुलिल्लाह्=आनंदाचे वेळीं देवाचें नांव घेणें. २ शक्स=इसम, मनुष्य. ३ बानी=प्रमुख.

ऐसा तभी मेरे दिलमे आचुका. काळोपंत, काळोपंत करके, पांच छे बरस जिसके नामके अवसाफ[१] सुन् रहेथे, ओ बिचारा[२] आज हमारे हातमे गिरफ्तार हो गया है!

**कृष्णाजीपंत**—आणखी जो उंच जवान चोवीस वर्षांच्या वयाचा, पाहतांच चेहेरा भव्य आणि शूर दिसतो, तो अमृतराव, तो संस्थानिकांचे सरदारांत प्रमुख आहे.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—उस कतलमे मै इस शक्सको खूब देखता था. आप जैसा बोलतेहो, वैसी रोअबदारी[३] बेशक है. ये हमारे सैय्यदपर आ पडाथा. लेकिन् बडी हिकमतसे उसका वार चुकाके उसको मैनें खुद्द बेहतियार करदिया.

**सैय्यद गफूर**—जनाब, लढाईके अवलही अपने सीदी रिसालेपर जिसने फौज लाकर और छापा मारकर सब लोगोंको बेइतिला गारत[४] किया था, ये ओही अमृतराव है ऐसा मैं सुनता हूं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—क्या बोलतेहो! क्या येही अमृतराव है? (त्वेषानें) अजी सैय्यद, ये तो हमारा सक्त दुषमन् है. झाडीमे छुप् रहकर गफलतसे हमारे रिसालेपर आके पडा; इसलिये वैसी हालत हुई. कबी रूबरू[५] मोकाबिला होता तो ये अमृतराव और उसकी फौज, फनाफिल्ला[६] हो जाती थी. रूबरू आनेकी इन् लोगोंकी क्या मगदूर है?

**कृष्णाजीपंत**—(मनांत) येथें जरा चढ द्यावी. (उघड)

---

१ अवसाफ=अस्कारा, अवाई. २ बिचारा=बापुडा. ३ रोअबदारी =वर्चस्व, दिखाऊपणा. ४ गारत=मागमूस नाहीं असें करणें. ५ रूबरू= समोरासमोर, समक्षासमक्ष. ६ फनाफिल्ल=निर्मूल, निःपात.

हुजूर सरकारच्या फौजेसमोर राहून लढाई करण्याजोगी यांची हिंमत ? हंः हें स्वप्नीं देखील व्हायचें नाहीं. यांची योग्यता ती काय ? हे नुस्ते दडून राहून रात्रीं चोरासारखे छापा घालणारे !

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—वाहवा ! आप दुरुस्त[1] कहते हो. अक्सर[2], इन मराठोंकी लढाईकी तारीफ ये ही है !

**कृष्णाजीपंत**—( मनांत ) संधि बरी आहे, असेंच घोडें पुढें ढकलूं. ( उघड ) खावंद आजपर्यंत आपल्या मोर्चावर रात्रीं येऊन छापा घालणारा हाच अमृतराव. याणें आणि त्या थेरड्या काळोपंतानें टिपूसुलतान बहाद्दर यांचें स्वामित्व कबूल करूं नये, ह्मणून आपल्या धन्यास बदसल्ला दिली; आणि यांच्याच भिस्तीवर हें लढाईचें खूळ माजलें व त्यामुळें संस्थान बुडालें ह्मणून मला कांहीं तादृश वाईट वाटत नाहीं ! परंतु त्यांच्या उद्धटपणामुळें आपल्या सरकारास एवढी जंगी फौज इकडे आणण्याचा खर्च व लढाईंत माणसांचा प्राणनाश ही भारी जोखीम आपल्या सरकारास पडली याबद्दल मात्र मला फार वाईट वाटत आहे. "कहां राजा भोज और कहां गंगातेली" या ह्मणीप्रमाणें यांनीं आपली योग्यता व कुवत न ओळखतां असें वर्तन केलें. सरकार, ही नुस्ती मस्ती, आणि दुसरें काय ? याशिवाय, सरकार, पाहा, या दोघांनीं आपल्या सरकारची व मुसलमानी धर्माची किती तरी निंदा केली ह्मणून सांगूं ? माझ्यानें त्या अमंगळ व अभद्र शब्दांचा उच्चार सुद्धां करवत नाहीं !

---

१ दुरुस्त=वाजवी, खरें; दुरुस्त कहते हो=ठीक बोललांत. २ अक्सर=बहुतकरून.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—ऐसा है क्या? देखीये, ( तलवार उपसून ) इस शमशीरसें इस घडी इन्‌की गर्दन् उडादेना जरूर है! लेकिन् उन लोगोंको सुलतान बहाद्दरके हुजूरमे जिंदा[1] लेजाकर दिखाना चाहताहूं.

**कृष्णाजीपंत**—( मनांत ) होस हो मिळविली पाहिजे. ( उघड ) सरकार, या गुलामांना जिवंत धरून पट्टणास पाठविण्यांतच सरकारची जास्त तारीफ आहे.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बेशक्! बेशक्!

**कृष्णाजीपंत**—खावंद, मला हंसूं येतें. हे ह्मणत होते कीं, आह्मी मुसलमानांस शरण जाणार नाहीं! पट्टणापर्यंत त्यांच्या मुडद्यांची शेज लावूं! पाहा सरकार, अशी हिंमत खरडे घांसणाऱ्या आह्मां ब्राह्मणांस आणि खिजमत करणाऱ्या मराठ्यांस शोभणारी आहे काय? हें हिंमतीचें बोलणें शूर मुसलमानांसच योग्य! त्यांणींच हातांत शस्त्र घेऊन राज्य मिळवावें आणि शिपाईगिरी गाजवावी!

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बहोत खूब! बेशक, आप जैसा फरमातेहो वैसी हिंमत मुसलमानोंमे ही है! देखो, ये जबरदस्त किला और मुल्क फतह् करके इस जहान्‌पर मुसलमानोंकी शमशीर कैसी चलती है, ये बतलानेके वास्ते लाखो रुपये खर्च हुये और हजारों आदमी कतल हुये हैं. इस सिवाय, इसमे और कुच मतलब नहीं है.

**कृष्णाजीपंत**—( खालीं वर मान वेळीत ) होय होय, यांत काय संशय? आपण ह्मणतां हेंच खरें. (हात जोडून) हें पाहा सरकार, राज्यलक्ष्मीचा उपभोग घेण्यांत जसे आपण मुसलमान लोक समर्थ आहां, तसेच या दुनियेंत

---

१ जिंदा=जिवंत.

ज्या ज्या ह्मणून सुंदर वस्तु आहेत त्या सर्वांचे भोक्ते देखील खरोखर आपणच आहां. ह्मणून पाहा, खुदानें कसें आपण होऊन हें ( चंपाकडे बोट करून ) अमूल्य रत्न आणून आपल्या हातीं दिलें आहे !

**चंपा**—( आपल्याशींच ) हा आपला कृष्णाजीपंत ना ? काळ उलटला ह्मणजे सर्वच कांहीं उलटतं ! अरे मेल्या ! नीचा ! अधमा ! कसं तुझं हें विपरीत वर्तन !

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—( तक्यावर पडून खुषीनें ) ओहो ! क्या बात है जी पंत ? ये तो अस्मान्की परी[1] है. आफेरीन्[2] ! खूबसुरती तो बोली नही जाती, मगर बादशाहोके गोषामहालोंमे शहाजादियां[3] और बेगमात[4] भी ऐसी न होंगी. देखो इस जमानेमे खूब सूरत जितनी चीजें[5] हैं, उन् सबको खुदाने एकठा[6] करके ये पुतली बनाई है, इसमे कुच शक नही ! जैसी ये खूबसुरती है वैसा उसका नसीबा भी अब खुल्ल जायेगा.

**कृष्णाजीपंत**—होय ! हें काय विचारावें ? ती जेव्हां आपल्या दृष्टीसमोर आली तेव्हांच तिचें दैव उदयास आलें.

**चंपा**—( आपल्याशींच ) आग लागो त्या दैवाला ! !

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अजी पंत ! ये किसकी लडकी है, और संस्थानवालेसे क्या निसबत[7] रखती है ?

---

१ परी=पुतळी, अस्मान्की परी=देवांगना, अप्सरा. २ आफरीन् =शाबास. ३ शहाजादी=बादशहाचे मुलीस ह्मणतात; अनेक वचन शहाजादियां. ४ बेगम=बादशहाचे बायकोस ह्मणतात; अनेक वचन बेगमात. ५ चीजें=वस्तु. ६ एकठा=एकत्र. ७ निसबत=संबंध, नातें; क्या निसबत रखती है?=तिचा काय संबंध किंवा नातें आहे?

**कृष्णाजीपंत**—जनाब, ही संस्थानिकांच्या पदरच्या एका मानकऱ्याची मुलगी आहे. इला संस्थानिकांनीं बाळपणापासून बाळगून आपली बहीण मानलेली आहे व ही त्या अमृतरावाची बायको आहे सरकार !

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—क्या ? ये अमृतरावकी जोरू है ?

**कृष्णाजीपंत**—होय खावंद. ( मनांत ) गुलाम कोणीकडे कलंडतो पाहूं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—( रागानें ) अमृतराव तो मेरा पूरा दुषमन् है. ओ काफीर[1] पट्टणको पोहोंचनेके बाद उसका सर तनसे[2] उडाया जायेगा, समजे ?

**चंपा**—( घाबरल्यासारखी होऊन आपल्याशींच ) या चांडाळाचा राग माझ्या प्राणप्रियाबरोबर माझ्याही प्राणांचा नाश करो ह्मणजे झालं !

**कृष्णाजीपंत**—( एकीकडे ) त्याचें काय वाटेल तें करूं दे. आपण आपलें बस्तान यथास्थित बसवूं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—भला, इस औरतका नाम क्या है ?

**कृष्णाजीपंत**—सरकार, इचें नांव चंपा आहे.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—शाबास ! क्या बात है ! इस चंपेकी खुषबो[3] मेरे दिमागमे[4] खूब समागई[5] है सच, लेकिन् इसके रंगोरौनख[6] परसे इसका नाम गुलाब रखा चाहता हूं ! पट्टणमें दरियादौलत[7] मेहेलके बगीचेमे सु-

१ काफीर=मुसलमानी धर्मांत नाहीं तो. २ तन्=शरीर, तन्से=शरीरापासून. ३ खुषबो=सुवास, सुगंध. ४ दिमाग=मस्तक; दिमागमे=मस्तकांत. ५ समागई=भरून जाणें; समागई है=भरून गेली आहे. ६ रंगोरौनख=रंग आणि रूप. ७ दरियादौलत=या संज्ञेचा महाल श्रीरंगपट्टण येथें टिपूच्या वेळेस होता. अद्यापही सदर इमारतीचा मुख्य भाग बहुतेक कायम असून त्याची दागदुजी सरकारांतून चालल्याचें कळतें.

बुह्के वक्त खुले हुवे गुलाबके फूल, और ये चंबेली एकही है !

**चंपा**—( आपल्याशीं ) जळो मेल्याची तारीफ !

**कृष्णाजीपंत**—सरकार, बगीचांतील गुलाबाचें फूल कांहीं वेळ ताजें राहून पुढें कोमेजतें. पण हें फूल असें आहे कीं, केव्हांही आपण याजकडे पाहत राहा हें सदोदित आपल्यास टवटवीतच दिसणार ! आणि याचा सुगंधही सर्वदा आपलें दिल खुष करणार ! ह्मणून महाराज ! हा सदागुलाब आहे, आणि याचा स्वाद घेण्यास या दुनियेंत आपणच लायक आहांत !

**चंपा**—(आपल्याशीं) मेल्या चांडाळा, तुझं तळपट होवो !

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बहोत खूब ? ( तक्यावर मागें पडून ) अलहमुदोलिल्लह् ! सच, सच, मेरे दिल खुष करनेंकी चीज इस दुनयांमे एहि है ऐसा मैं समज लिया हूं. ये बात, आपकी लाख रुपियाकी जबान परसे साबीत हुई.

**चंपा**—देवा, हीं अभद्र भाषणं कशीं सहन करूं ! या चांडाळांच्या तोंडांला खीळ कां पडेना !

**कृष्णाजीपंत**—या आपल्या आनंदावरून तिचें सुंदर रूप, व नाजूक तनु यांच्या योग्य आपल्याकडून तिला बादशाही सुख मिळणार आहे हें उघड आहे. असें त्या नादान अमृतरावाकडे स्वप्नांतही मिळण्याची भ्रांति होती. वाः, आतां या बाई बेगमसाहेब होणार ! याचें नांव नशीब.

**चंपा**—( आपल्याशींच ) हरामखोरा, झडो तुझी ती जिव्हा ! ( बोटें मोडते. )

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अलबत्ता, क्या पूछते हो ! चाहेसो खिदमत् करनेकेवास्ते तय्यार हूं ! देखीये, अब

ऐसी नाजूक पुतलीको यहां खडी रहनेकी तकलीफ देनेसे खुदाकी दर्गाहमें[1] बडा गुन्हा होगा. इसलिये इसको म्यानेमें बिठाकर बडी खातिरदारीसें जलदी अपने डेरेमें लेजाना. मिसले[2] गुलाबके फूलके किनकाब और मशरूके निहालीपर[3] लेटने[4] दो! जरूर सवारी मंगवाव.

**चंपा**—(म्याना आणण्याचा हुकूम ऐकून) हाय, हाय, देवा!! आतां करूं तरी काय? (जमिनीवर पडून रडत) हजारों माणसं त्या गर्दीत प्राणांस मुकलीं त्यांत एखादा वार लागून माझा अंत कां होऊं नये? बरोबर राहण्याचा हट्ट घेतला ह्मणून मला तिकडून रागं भरणं झालं, तेव्हां मीं त्वेषानं आपल्या मानेवर घालण्याकरितां वर उचललेली तलवार दादांनीं माझ्या हातांतून हिसकावून घेतली नसती, तर त्या दोघांच्या पायांजवळ मी सुखानं मेलें नसतें काय? आई, वहिनी यांनीं आपल्याबरोबर मला नेण्याची पराकाष्ठा केली; पण त्यांचं न ऐकतां दादांच्या आणि प्रियपतींच्या पायांची सेवा शेवटवेरीं करावी ह्मणून, हेक्यानं राहिलें, पण तसं घडणं माझ्या दैवीं कोठें आहे? (रडत) माझ्या अदृष्टीं हेळणा अपेष्टा करून घेण्याचं आलं आहे! (डोळे पुशीत) देवा! खाटकाच्या हातीं जशी गाय सांपडावी, तशी या वेळेस माझी अवस्था झाली आहे. यांतून मला कोण बरं मुक्त करील! (मोठ्यानें रडूं लागते).

**कृष्णाजीपंत**—कोण बुवा चमत्कार हा? रडतां काय ह्मणून तुह्मी? असें काय तुमच्यावर संकट आलें आहे? अहो, तुमचें नशीब उदयास आलें ह्मटलें पाहिजे, समजलांत?

---

१ खुदाकी दर्गाहमें=देवाचे घरीं किंवा देवाचे दारीं. २ मिसल=योग्य. ३ निहाली=रुजामा. ४ लेटना=लोळणें; लेटने दो=लोळूं दे.

**चंपा**—( कृष्णाजीपंताच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ) देवा, व्यंकटपती, सर्वपरी तूं आमच्याकडे डोळे झांकिलेस, ह्मणून सिंहासारखे शूर आप्पा, दादा, आणि माझे खासे हे सर्व बदींत पडून राहिले! ( रडत ) ते जर येथें असते तर या चांडाळांच्या तोंडांतून अशीं अभद्र भाषणं निघण्याची काय हिंमत होती? तात्काळ या मेल्यांचे तुकडे पडले नसते का? ( डोळे पुशीत ) शूरांच्या पोटीं जन्मलें; प्रतापी **भा**वे घराण्यांत वाढलें आणि वीरांच्या पदरीं पडलें; असं असून शेवटीं अशी मानखंडणा व्हावी का? (कपाळाला हात लावून) दैवा, दैवा! दैवा!!! तुझ्या नांवानं कितीरे दगड फोडूं! (रडते.)

**कृष्णाजीपंत**—अहो बाई, आपण काय ह्मणून दैवाला दोष देऊन शोक करीत बसलां आहां? आपलें दैव सव्वा हात लांब आहे! याची प्रचीती लवकरच डेऱ्यांत गेल्यावर येईल. तिकडे इंद्रभुवनासारख्या तयार झालेल्या जनानखान्यांत गेल्यावर हें सर्व आपण विसराल. मात्र तूर्त हें आपलें रडणें पाहून ( सैय्यद बुऱ्हानुद्दिनाकडे हात करून ) या आमच्या सरकारच्या मनास क्लेश होणार आहेत त्याची मला कळकळ वाटते. ह्मणून ह्मणतों रडूं नका.

**चंपा**—( डोळे पुशीत रागानें ) खरं रे बाबा, माझी कळकळ तुला कोठून येणार? ज्यांची थुंकी झेलीत तूं येथें बसला आहेस त्यांचीच तुला कळकळ वाटावयाची!

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—( सैयद गफूरकडे ) कृष्णाजीपंत जो बात बोलते है वो सच है. क्यौंके, ये रोना देखकर मेरे दिलको निहायत[1] रंज[2] होता है! अब इसको डेरेमें लेजानेकेबाद, हरतौरसे इसका दिल खुश करना जरूर है.

---

१ निहायत्=भारी, फार. २ रंज=खेद, दुःख.

**कृष्णाजीपंत**—पाहिलेंत बाई, मी खोटें सांगतों का ? अहो, ज्यांच्यावर यांचें प्रेम लागून गेलें आहे त्यांच्याबद्दल असा जीव तळमळायचाच ? ह्मणून पुनः ह्मणतों रडूं नका. आपलें पुढचें वैभव मनांत आणून शांत व्हा. आणि जरा हंसून खेळून आमच्या सरकारचें मन खुष करा.

**चंपा**—(संतापलेली उभी राहून) गुलामा, मांगा, जर माझ्या हातीं या वेळेस तरवार असती तर तुझ्या मुंडक्याची खबर घेऊन मन खुष कसं करावयाचं तें याच घटकेस तुला दाखविलं असतं ! पण काय करूं !! (जमिनीवर हात पाय आपटते.)

**कृष्णाजीपंत**—(आपल्याशीं) आतां हातपायच आपटायाचें, दुसरें काय ?

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—इसका घुस्सा तो क्या तेज[1] है ! वाहवा ! वाहवा !

**कृष्णाजीपंत**—त्यांत त्यांची रागानें उभी राहण्याची ऐट त्यांच्या अपूर्व सौंदर्यास कशी शोभा देत आहे पाहवें सरकार. खुबी लक्षांत आलीच असेल ?

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—क्या बात है ? जो खुबीके आप बतलाते हो, ओ जबही मेरे दिलमे आचुकी है. मगर, उसकी तारीफ जबानसे बयान नही की जाती है !

**कृष्णाजीपंत**—सरकार, माझें बोलणें पुरतें लक्षांत न घेतां ह्या मजवर निष्कारण रागावतात, इलाज नाहीं.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—पंत, आप कदरदान[2] हो. उसकी सक्त जबान आपको बूरी मालूम होती होगी. ले-

---

१ तेज=कडक. २ कदरदान=योग्यता समजणारे.

किन् ये औरत है इसलिये आप दिलमें खफा न होगे ऐसा मै यंखीन[1] करता हूं.

**कृष्णाजीपंत**—काय सरकार, त्यांच्या बोलण्याचा राग ? हें स्वप्नांतसुद्धां होणें नाहीं.

**चंपा**—मेल्या निलाजऱ्या, जळो तुझा तोंडपुजेपणा.

**कृष्णाजीपंत**—अहो चंपाताई, यांत तोंडपुजेपणा तो कशाचा ? आतां आपण आमच्या धनीण बनलांत; तेव्हां धनी जर दोन शब्दांनीं रागावले, तर त्याचें कां वाईट वाटावें ? मग त्यांत सेवकपणा तो काय ?

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—बेशक ! बेशक ! आप बहोत अच्छी बात बोले. (मेणा आल्याची वर्दी ऐकतांच, चंपाकडे हात करून) मियानेमें बैठनेकेवास्ते केह दीजिये ?

**कृष्णाजीपंत**—चलावें बाईसाहेब—नाहीं, विसरलों—बेगमसाहेब, मेण्यांत बसावें.

**चंपा**—(जमिनीवर पडून) नको नको, मला नेऊं नकारे बाबांनो ! माझ्या माणसांकडे मला जाऊं द्या. (रडत) माझे प्रिय दादा व माझे खासे माझी वाट पाहत असतील. चंपा कुठं गेली, तिचं काय झालं ह्मणून त्यांचा जीव काळजींत सारखा टांगणीला लागून तळमळत असेल. तर त्यांची माझी तुटातूट करूं नका. मला त्यांजकडे पोहोंचवा.

**कृष्णाजीपंत**—अहो, कशाचे दादा आणि खासे घेऊन बसलां आहांत ? आतां त्यांचें काय राहिलें आहे ? त्यांच्याकडे जाऊन तुह्मांस मिळणार तरी काय ? बंदिखानाच ना ? छत् ! तुमच्यासारख्यास तें स्थळ उचित

---

१ यखीन करना=भरंवसा धरणें.

नाहीं. तर आतां मुकाट्यानें मेण्यांत बसून डेऱ्याकडे च-लावें आपल्या जनानखान्यांत.

**चंपा**—जळो तो जनानखाना, आणि आग लागो त्या तुझ्या तोंडाला! माझ्या आवडत्या माणसांबरोबर मला तो बंदिखानाच सुखाचा आहे. तर मला त्यांजकडेच जाऊं दे. (रडते.)

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—(चंपापुढें उभा राहून) खुदाके कुदरतसे[1] तुमारे नशीबकी तरकी[2] हुई; हमारी सरदारी और दौलत सब तुमारी है. मेहेरबानी फरमाके अब डे-रेमें चलना.

**चंपा**—(त्याला समोर पाहून) (कांपत) बाबारे, तूं माझ्या बापासारखा आहेस. पोटची पोर असं समजून, माझं पातिव्रत्य राख, नाहींपेक्षां मी शत्रूकडील आहेंच, त्याअर्थी तुझ्या हातीं असलेल्या शस्त्रानं माझा शिरच्छेद करून टाक! व्यर्थ माझा छळ करूं नकोस.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—(परत आपल्या जागीं बसून) औरतकी जात कमअक्कल होती है, इसलिये लाइलाजी[3] है. (कृष्णाजीपंताकडे) अजी पंत, आप उसका हात पक-डके आहिस्ते[4] लिजाके मियानेमें बिठला दीजिये.

**कृष्णाजीपंत**—जो हुकूम. (चंपाजवळ जाऊन तिचा हात धरणार तोंच.)

**चंपा**—(संतापून उठून उभी राहते आणि डोळे वटारून) अरे कृतघ्ना, नीचा, अधमा, ज्या नरगुंदकरांचं अन्न आज-वर खाल्लंस त्यांचा काळ विपरीत होतांच त्यांजवर उल-

---

१ कुदरत=कृपा; खुदाके कुदरतसे=ईशकृपेनें किंवा इच्छेनें. २ तरकी=बढती. ३ लाइलाजी—नाइलाज. ४ आहिस्ते—हलकेच.

टून त्यांची निंदा आणि आपलं पोट जाळण्याच्या आशेनं शत्रूची खुशामत करीत बसून, शेवटीं मुडदारा, माझा हात धरून मला मेण्यांत बसविणार काय? मांगा, खबरदार मला शिवशील तर! (सगळ्यांकडे हात करून) मी आतां सर्वांना निक्षून सांगतें कीं, मजवर बलात्कार तर एकीकडे राहूं द्या! नुस्ता जर कुणी मला स्पर्श जरी केला, तर पाहा! जीभ हांसडून किंवा खांबावर डोकं आपटून तात्काळ प्राणत्याग करीन! (खालीं पडून) माते धरित्री, या प्रसंगीं तूं तरी दुभंग होऊन मला आपल्या पोटांत घे आणि माझा मान रक्षण कर. शिव! शिव! देवा!! (असें म्हणून कांहीं वेळ मूर्च्छित होते.)

**कृष्णाजीपंत**—बायकांकडून असा आतताईपणा व्हायाचाच! मुकाट्यानें उचलावी आणि मेण्यांत घालून न्यावी, सरकार.

**सैय्यद गफूर**—(सैय्यद बुऱ्हानुद्दिनास उद्देशून) जनाब, मेरी थोडी अर्ज है. सरकारको पसंद पडी तो खियालमे लीजिये.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अछा, सैयदसाहेब बोलीये.

**सैय्यद गफूर**—जनाबेआली, मै ये समजताहूं के, ये औरत इस वक्तके वारिदाते[1] जंगसे, और अपने प्यारोंकी जुदाईसे[2] दुखभरी और बेकरार[3] है. अगर इसवक्त आपके डेरेमें उसको जाये फरमाओगे तो, हलाकतका[4]

१ वारिदाते—चाललेलें; वारिदाते जंगसे=चाललेल्या लढाईमुळें. २ जुदाई=तुटातूट; प्यारोंके जुदाईसे=प्रीतीच्या माणसांपासून तुटातूट झाल्यानें. ३ बेकरार=नाराज. ४ हलाकतका=मरण्याजोगा.

स[1]दमा इसके तनूपर गुजरेगा. मुनासिब ये है के, चंदरोज इसी महलमें इसको रहने दीजिये. बाद खातरजमीके अपने डेरेमें लेजाना मुनासि[2]ब होगा.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—भला सैय्यद, आपके केहनेके मुवाफिक चंदरोज इसी महलमें इसको रहने दीजिये. (कृष्णाजीपंतास लक्षून) लेकिन् पंत, आप यहां इनके पास रेहके सब बातकी बंदोबस्ती और [3]खातरखह् इंतिझाम रखना. किसी बातकी [4]तकलीफ न होवे.

**कृष्णाजीपंत**—(मनांत) मिय्या तो पाघळले! चला, आपलें काय गेलें; आपणही त्यासारखीच टिमकी वाजवूं! हो हो! हवा तसा बंदोबस्त ठेवितों. (खालीं वर मान वेळीत) होय! एका अर्थानें पाहिलें तर, (सैय्यद गफूरकडे हात करून) या साहेबांचें ह्मणणें अगदीं रास्त आहे. कां कीं, नुकत्याच सर्व गोष्टी ताज्या घडून आलेल्या. त्यांत आमच्या चंपाताईचें मन किती कोमल! अशा कोंवळ्या मनास अशा प्रसंगीं व्यग्रता येणें वास्तविक आहे! तेव्हां तूर्त येथें या वाड्यांतच राहिल्यानें दिवसेंदिवस त्यांच्या जीवाला आरामही वाटत जाईल. मुख्य त्यांच्या जीवाला संभाळून जें करणें तें केल्यास दोहोंकडे कल्याणप्रद होणार आहे. माझ्या मनांत देखील हें प्रथमच सुचविण्याचें आलें होतें, परंतु ह्मटलें—

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—देखो पंत, रास्त बातकी [5]इतिला करनेको कुच डर नहीं. आप और सैय्यद गफूर साहेब, दोनों हमारे मसलेहत् देनेवाले हो.

---

१ सदमा=धक्का. २ मुनासिब= वाजवी, योग्य. ३ खातरखह्=मर्जीप्रमाणें. ४ तकलीफ=अडचण, त्रास. ५ इतिला=सूचना.

**कृष्णाजीपंत**—( हात जोडून ) आपण आह्मां ताबेदारांवर इतबार ठेवून ऐकतां, ह्मणून सांगण्यास आह्मांस उमेद येते. नाहींपेक्षां आमची काय मगदूर आहे ?

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—देखीये पंत, इस नरगुंदवालेके साथ किस तौरसे जंग चलाना इसलिये आपने उमदा मसलहत् दी. इसलिये सरकार बंदगानेआली टिपूसुलतान बहाद्दर आपकी बडी तारीफ करके तहरीरी[1] हुकूम फरमाते हैं. और, आखीरकों आपके ही तदबीरसे ये जबरदस्त किला फतह्‌ हो गया, इसलिये आपके तरकी[2]केवास्ते हम हुजूरको जलद ईतिला[3] देंगे.

**कृष्णाजीपंत**—बंदगानेआली सरकारची हरएक ताबेदारी करण्यास हा बंदा तयार आहे. ( हात जोडतो. )

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अजी सैय्यद साहेब, चलीयें अब फौजमे जाईयें.

**सैय्यद गफूर**—चलीये. ( दोघे जातात. )

**कृष्णाजीपंत**—चलावें चंपाताई आंत. नोकर चाकर आणवून आपली सगळी तरतूद करतों.

**चंपा**—( आपल्याशींच ) असो ! आजचं मरण उद्यांवर गेलं. पुढचं पुढं पाहतां येईल.

( सर्व जातात. )

**अंक चवथा समाप्त.**

---

१ तहरीरी=लिहून आलेले. २ तरकी=बढती. ३ इतिला=अभिप्राय.

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ.**—नरगुंदकरांचे वाड्यांतील चंपास बंदींत ठेविलेली जागा.

**चंपा**—(आपल्याशींच विचार करीत बसली आहे.) आतां माझीं माणसं मला कशीं बरं भेटतील? ते तिकडे बंदींत पडून राहिले आणि मी इकडे! आपले राज्यांत त्या टिपूनं एवढा बखेडा आरंभिला, नरगुंदकरांसारखे संस्थानिकांस बंदींत टाकिलं, ही हाकाटी पेशव्यांच्या कानीं गेल्यावर ते त्या टिपूचं पारिपत्य करून आपल्या माणसांस बंधमुक्त नाहीं का करायचे? करतीलच. शिवाय भाऊसाहेब पटवर्धन हे या संस्थानचे मोठे अभिमानी आहेत ते हें सगळं ऐकून उगीच बसतील का? असं कधींच नाहीं व्हायचं. हें सगळं मनांत आणलं तर, माझीं माणसं सुटण्याची आशा आहे. परंतु हल्लींच्या प्रसंगावरून पाहतां, माझी मात्र अवस्था कठीण दिसते; परिणाम काय होईल सांगवत नाहीं. स्थानभ्रष्ट झालें ह्मणून देह का भ्रष्ट करून घ्यायचा? शिव शिव!! तसं कालत्रयीं घडायचं नाहीं. बायकांनीं जर आपलं प्रातिव्रत्य नष्ट होऊं दिलं तर दोहोंकडचीं बेचाळीस कुळं नरकांत जातात अशी शास्त्राची सांगी आहे. हें एवढं पातकाचं ओझं! ही जगांत अपकीर्ति व शिवाय कुळाला कलंक! हाय! हाय! देवा, नकोरे हें दुर्भाग्य माझे कपाळीं आणूं! (आंगावर शहारे येऊन डोळे पुसते.) देवा, जन्मतांच मेलें असतें तर ही कटकट

कपाळीं कां येती ? मुलगी जन्मास आली ह्मणजे ती जगांत कशी नांदेल या भीतीनं पृथ्वी कांपते अशी ह्मण आहे ती खरी आहे. धिक्कार असो या बायकांचे जन्माला ! परमेश्वरा, जर हे दुराग्रही, दुष्ट व अविचारी यवन मजवर बलात्कार करतील तर मी काय करूं ? (रडूं लागते, क्षणांत पुनः ईर्षेनें) कोण मला हात लावणार ? काय त्यांची माय व्याली आहे ? अरे, या आपल्या प्राणांशीं संलग्न अशा मूर्तींची पूजा प्रेमरूपी देव्हाऱ्यांत तनमनधनेंकरून मी करीत असतां अशा पवित्र स्थानीं शिरण्याची या यवनश्वानांची काय मगदूर आहे ? जरी मी या वेळेस शक्तीनं त्यांचं निवारण करण्यास असमर्थ झालें आहें, तरी मी युक्तीनं तसं केल्यावांचून राहणार नाहीं ! पुढं दैवानं आपलीं माणसं बंदींतून मुक्त झालीं तर भेटतीलच. नाहींपेक्षां हा देहसुद्धां दुसऱ्याचे हातीं न लागेल अशा तऱ्हेनं या जन्माचा शेवट करून घेईन ! या बंदींतून पार होण्यास हाच वाडा सोईचा आहे. (विचार करून) हं हं ! ठीक आहे. पण जवळ कोणी काळजीचं माणूस नाहीं. तेव्हां हिकमतीनं आपल्या साळूस आणवून मसलत पार पाडावी. शत्रूंनीं मजवर देखरेख करण्यासाठीं कृष्णाजीपंतास ठेविलं आहे. त्या मांगाचं नांवसुद्धां घेऊं नये खरं, पण काय करूं ? समयावर लक्ष ठेवून डोळ्यावर कातडं ओढणं भाग आहे. पाण्यांत राहून माशांशीं वैर करूं नये त्याप्रमाणें त्या चांडाळाशीं सख्य ठेवून आपला मतलब जिंकावा हें बरं. (इतक्यांत कृष्णाजीपंत येतो त्याला पाहून) या पंत, बसा. (तो बसतो.) जेवण झालं का ?

**कृष्णाजीपंत**—इतक्यांत कोठून होणार ? नुकतीच

राज्यक्रांति झालेली; गांवांतील एक मनुष्यसुद्धां अद्याप थाऱ्याला लागेना. पाहा, एवढी मोठी दांडगी पेठ, पण सगळी येथून तेथून ओस पडली आहे. लष्कराला सरंजाम पुरविण्याचें फार कठीण झालें आहे. तेव्हां मोठ्या खटपटीनें पेठेच्या शेटीला आणवून वाण्यांकडून दुकानें उघडविण्याची खटपट हा वेळ केली, आणि इकडे आलों. आपला बंदोबस्त कसा काय आहे हें पाहून बिऱ्हाडीं जावें ह्मटलें.

**चंपा**—कांहीं कमी नाहीं. माझा सगळा बंदोबस्त यथास्थित आहे.

**कृष्णजीपंत**—पण आतां आपल्याला जरा बरें वाटतें ना?

**चंपा**—(मनांत) आतां याच्या सारखंच बोललं पाहिजे. (उघड) चार दिवस अवघड वाटलं. मनाला चैन पडत नव्हतं, पण आतां नाहीं तितकं वाटत!

**कृष्णाजीपंत**—आपण मनाला कोणत्याही प्रकारें अवघड वाटूं देऊं नका. आपण ह्मणाल तशी मी व्यवस्था ठेवीन. मी आपलाच आहें.

**चंपा**—(मनांत) आतां जास्त याच्या पोटांत शिरायला हवं, तरच सगळं साधेल. (उघड) तुह्मावांचून इथं मला दुसरं कोण आहे? दादासाहेब, आईसाहेब, यांच्या जागीं आतां तुह्मीच.

**कृष्णाजीपंत**—तुह्मी मानाल तर तसें खरेंच.

**चंपा**—आतां जिकडून माझं चांगलं होईल, तसं करा ह्मणजे झालं. तुह्मी जसं सांगाल तसं मी ऐकेन.

**कृष्णाजीपंत**—(एकीकडे) वाघ सुद्धां सांपळ्यांत सांपडला ह्मणजे नरम होतो; तूं तर यःकश्चित् बायको,

न ऐकून सांगतेस कोणाला ? बरें इच्या मनांत काय आहे तें युक्तीनें काढून घेऊं. (उघड) तुह्माला येथें आणिलें त्या दिवशीं तुह्मी मजवर भारी रागवलां होतां. आतां नाहीं ना राग ?

**चंपा**—छे: हो, राग कसला ? त्या दिवशींची ती वेळच तशी होती. तुह्मीच पाहा बरं ? गाईपासून वांसराची जशी तुटातूट करावी तशी माझ्या प्रीतीच्या माणसांतून मला ओढून आणून कधीं जन्मांत न पाहिलेल्या अशा त्या भयंकर माणसांचेपुढं एकाएकीं उभं केलं. मग भीतीनं जीव गांगरल्यासारखा नाहीं का व्हायचा ? तेव्हां मला शुद्धि तरी होती का पण ? तिथं काय काय घडलं, तें पुरतं माझ्या लक्षांत देखील नाहीं ! येऊन उभी राहिलें मात्र, सर्वांगाला कांप सुटला, आणि आंगांत बघा उभं वारं शिरलं, समजलांत का ? मी नाहीं हो बुवा तुमच्यावर दाटून रागावलें.

**कृष्णाजीपंत**—(मनांत, आपल्या मतलबास अनुसरून) बरीच मऊ आली. अशांतच हिचें मन वळवावें, ह्मणजे तो दाढीवाला सहज आपले हातीं येईल. (उघड, खालींवर मान वेळीत) होय ! होय ! खरंच, तो प्रसंगच तसा होता. त्या तुमच्या बोलण्याबद्दल माझे मनांत खरोखर कांहीं नाहीं ! अहो, पाहा, राज्यक्रांतींत शत्रूकडील जिंकलेल्या सुंदर स्त्रिया राजांनीं नेऊन आपल्या घरांत घालायच्याच ! अशीं हजारों उदाहरणें आजपर्यंत घडलेलीं ऐकिलीं आहेत. त्यांतलाच हा एक प्रकार, झालें. आणखी दुसरें काय ?

**चंपा**—पण, तें या प्रसंगीं माझ्या कपाळीं आलं ना ? (सुस्कारा टाकते.)

**कृष्णाजीपंत**—अहो, त्यांत काय? चाललेंच आहे! पुढें याच बायकांना जरा संवय झाली, ह्मणजे त्या आनंदानें राहतात.

**चंपा**—मग काय करतील बिचाऱ्या?

**कृष्णाजीपंत**—(मनांत) बेतावर येईल असें धोरण दिसतें. (उघड) अहो, त्या लढाईच्या गर्दीत तुह्माला बायको असें ओळखून त्या सरदारानें समोर आणलेंच. तेव्हां मग मीं मनांत असा विचार केला कीं, येथें आतां यांचें चांगल्या रीतीनें कल्याण तरी होऊं द्यावें. ह्मणून तुमच्या सौंदर्याची यंव त्यंव अशी खूब त्या सरदारापुढें तारीफ करून त्याला फुगविलें. अशी खुबी केली ह्मणूनच तेव्हांपासून आपल्याबद्दल त्याचें मन इतकें वेडें होऊन गेलें आहे कीं सांगतां सोय नाहीं! क्षणोक्षणीं आपल्या समाचाराबद्दल माणसांवर माणसें पाठवितो. (हें ऐकून चंपा तिरस्कारानें मान फिरवते.) कृष्णाजीपंत (एकीकडे) पाहा कशी मुरकते! प्रकरण ताळ्यावर येत चाललें. (उघड) थोड्या दिवसांतच सुधारतील असा मी त्यांना नेहमीं निरोप पाठवीत असतों.

**चंपा**—(मनांत) आपल्या मतलबाकडे जरासा याला ओढून पाहूं! (उघड) इथं हा आला आहे तोच का तो टिपू सुलतान?

**कृष्णाजीपंत**—हा नव्हे टिपू सुलतान. याचें नांव सय्यद बुऱ्हानुद्दिन. हा त्याचे पदरचा एक मातब्बर सरदार आहे. याच्याकडे उत्तरेकडील राज्यें जिंकण्याचें काम असून याचे दिमतीस फार मोठी फौज आहे. हा कांहीं साधारण नव्हे बरें? त्या दरबारांत हें एक मोठें धेंडच आहे.

**चंपा**—हा आतां माझी काय वाट करणार ?

**कृष्णाजीपंत**—तो तुह्माला आपल्या गोषांत घालील, दुसरें काय करणार ? (एकीकडे) पाहूं बरें काय उद्गार निघतात ते !

**चंपा**—(आपल्या मतलबास अनुसरून) कृष्णाजीपंत, तुह्मी खोल विचारी आणि सुज्ञ आहांत ह्मणून मी आपल्या मनांतलं तुह्मापाशीं बोलावं ह्मणतें.

**कृष्णाजीपंत**—(मान डोलवीत) होय, अवश्य बोलावें.

**चंपा**—अहो, पाहा, जेणेंकरून तुमचं आणि माझं उभयतांचं कल्याण होईल अशी एक मला युक्ति सुचली आहे. ती तुमच्यानं साधेल, तर मी सांगेन तसंच करा! आणि नाहीं साधत असं वाटेल तर मी बोलतें हें कुणापुढं बोलूं नका ह्मणजे झालं.

**कृष्णाजीपंत**—(उत्सुकतेनें) अहो, ज्यांत आपलें उभयतांचें कल्याण आहे अशी गोष्ट मी का दुसऱ्यापुढें सांगेन ? हें कालत्रयीं व्हायचें नाहीं. मर्जीस आल्यास माझे दोघे मुलगे आहेत त्यांची शपथ घ्या हवी तर.

**चंपा**—अहो, शपथ कशाला ? तुमच्या बोलण्यावर का माझा विश्वास नाहीं ?

**कृष्णाजीपंत**—(गंभीर मुद्रेनें) मग खुशाल सांगा. देवाची शपथ! मी चकार शब्दसुद्धां दुसऱ्याकडे काढणार नाहीं !

**चंपा**—अहो बघा, मुसलमानाच्या गोषांतच जायचं ना ? मग हा सरदार तरी कां ?

**कृष्णाजीपंत**—(साश्चर्य एकीकडे) या भाषणांत कांहीं तरी विशेष आहे ! (उघड) मग ह्मणतां काय ?

**चंपा**—अहो, एवींतेवीं यांच्या हातीं सांपडलें खरी! मग मला टिपू सुलतानाकडेसच धाडण्याची युक्ति काढा पाहूं?

**कृष्णाजीपंत**—(किंचित् हसून) एकदम इंद्राणीचेंच पद ह्मणा एकूण?

**चंपा**—(आपल्या मतलबास अनुसरून) कांहीं ह्मणा! पण ही युक्ति तुह्माला मानवली का?

**कृष्णाजीपंत**—(मनांत) हिच्या मनांत हें जें आलें आहे यावरून आपलाही भाग्योदयच समजला पाहिजे. कारण, हिच्या सहायानें मागेंपुढें टिपूच्या दरबारीं मी दिवाणगिरी कां नाहीं पटकाविणार? तेव्हां टिपूच्या वैभवाचें प्रसंगास योग्य असें वर्णन करून हिचें मन त्याकडेच दृढतर होईल असें केलें पाहिजे. (उघड, मोठ्या उत्सुकतेनें) मानवली ह्मणून काय विचारतां? याविषयीं माझी पूर्ण संमति आहे. उष्टें खायचें तें तुपाकरतां ना? मग या सरदाराचा भिकारडा जनानखाना तरी हवा कशाला? अहो, सोन्यारुप्याचे छडीवाले हजारों भालदार ज्याच्या स्वारीपुढें ललकारीत असतात; ज्याच्या देवडीसमोर हत्तींचे कळपांचे कळप सोन्याच्या अलंकारांसहित भरजरी झुली घातलेले मेघगर्जनेप्रमाणें आरोळ्या देत पायांतील रुप्याच्या लंगरांचा खणाखण शब्द करीत झुलत राहिले आहेत; समुद्रासारखें अफाट व नौबतींच्या दणाक्यानें व तोफांचे भडिमारानें आकाशपाताळ दणाणून टाकणारें असें ज्याचें सैन्य आहे; समुद्रांतील टोपीवाला फिरंगी ज्याचे हातीं आपण सांपडल्यास आपल्यास अंधार कोठडींत कोंबून मारील या भीतीनें पेशवे, निजाम यांचे-

आड दडून राहिला आहे; राजकार्यधुरंधर ह्मणविणारे पेशवे व इतर बलाढ्य राजांवर ज्याणें आपल्या शौर्याचा दरारा बसवून सकल पादशहांत श्रेष्ठ असें सुलतान पद जो पावला आहे; अशा टिपू बहादराच्या जनानखान्यांत जाण्यास कोण नको ह्मणेल? अवश्यमेव जाण्याचा यत्न केला पाहिजे. आणि हा यत्न साध्य करण्याचे कामीं कंबर बांधून हा मी एका पायावर तय्यार आहें.

**चंपा**—वर्णन करण्यांत तुमची तरी बुवा शर्थ आहे! त्या टिपूचे वैभवाचं चित्र थोडक्यांतच हुबेहूब डोळ्यांपुढं उभं केलंत! त्याचं वैभव व दरारा हीं माझ्या पूर्ण लक्षांत आलीं; तुह्मी यत्न करायलाही तयार झालांत; परंतु तुमची त्याच्या दरबारीं चांगली वग आहे का पण?

**कृष्णाजीपंत**—वग? मीर सादक वजीराचा मला पूर्ण वशीला आहे. इतकेंच नव्हे, तर या नरगुंदकरांकडील वकिलीचें मिष करून मीं श्रीरंगपट्टणास गेल्यानंतर या संस्थानिकांचीं तशींच पेशव्यांचीं सर्व छिद्रें टिपू सुलतानास कळवून हा किल्ला व इकडील प्रांत त्याच्या हस्तगत कसा होईल या बाबतींत सल्ला दिली. आणि पुढेंही राज्य जिंकण्याचे कामीं सहाय देण्याचें वचन देऊन मी त्याच्या हुकुमानेंच मुद्दाम हल्लीं येथें आलों आहें. त्या टिपूवर मीं आपली अशी छाप बसविली आहे कीं, तो मी ह्मणेन तें करील व सांगेन तें ऐकेल अशी माझी खातरी आहे.

**चंपा**—ठीक! ठीक! मग हा एथे आलेला सरदार देखील तुमच्या छापींत आला असेल?

**कृष्णाजीपंत**—(उमेदीनें) छापींत? तो तर पूर्णपणें

आला आहे ! या नरगुंदच्या किल्ल्यावर हल्ला चढविण्याचे वेळीं माझी कर्तबगारी कशी काय आहे हें या सय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारास कळून चुकलें आहे.

**चंपा**—(मनांत) मर मेल्या ! कसंही करून मला कांहीं दिवस या वाड्यांत राहण्याची सोय तुझ्याकडून झाली ह्मणजे पुरे ! "अशुभस्य कालहरणम्" वाईट दिवस जातील तितके पुढं ढकलावे. इथें राहिल्या अवधींत निसटून जाण्याची खटपट साधली ह्मणजे झालं. (उघड) बरं, मला श्रीरंगपट्टणास टिपूकडे धाडण्याची युक्ति कशी काय करणार ?

**कृष्णाजीपंत**—आपल्या सौंदर्याची खूब तारीफ करून अशा लावण्यवतीस हुजूरच्या (टिपूच्या) ताबेदारीस बुध्या न पाठवितां, आपल्या स्वार्थाकरितां बद्दनिगेच्या इराद्यानें या सैय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारानें तुह्मास आपल्या ताब्यांत ठेवून घेण्याचा बेत केला आहे, असें मीर सादक वजीराचे मार्फत व दुसरेंही एक धोरण आहे त्या द्वारानें टिपूच्या कानावर घालतों, आणि तुह्मास अचानक नेऊन त्याचेकडे गुदरतों.

**चंपा**—एकूण या सगळ्या खटपटीस मासपक्ष लागणार?

**कृष्णाजीपंत**—गडबड कां ? दोन अगर चार महिने कां लागेनात ? तुह्मी स्वस्थ राहा. मुख्य तुमच्या मनांतील हेतु कळला, आतां पुढील मसलत मजलेस पोंचविणें मजकडे.

**चंपा**—पण तुमचा बेत ठरेपर्यंत राहवं कुठें ? एखादे वेळेस हा सरदार आपल्या डेऱ्यांत मला जुलमानं घेऊन जाईल ! मग पुढं गत कशी ?

**कृष्णाजीपंत**—(छातीस हात लावून) चंपाताई, हा बच्चाजी असा बिलंदर आहे कीं, या सैय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारासारख्या हजारांस खाकोटीस मारील! तुमच्याबद्दल नेहमीं त्याचें व माझें भाषण चालत असतें. त्या भाषणांत त्याच्याच धोरणानें, त्याच्याच कलानें, गोडीगुलाबीचें बोलणें चालवून "अद्याप चंपाताईचें मन स्थिर झालें नाहीं; अंजारून गोंजारून त्यांचें समाधान करीत असतों; त्यामुळें त्या थोड्याशा बेतावर येत चालल्या आहेत; आणखी जराशा आटोक्यांत येतांच आठ दिवसांनीं, पंधरा दिवसांनीं, आज उद्यां त्यांना आपल्या डेऱ्यांत आणतों" अशा थापांचें मधीचें बोट या सरदाराच्या तोंडास लावून त्याजकडून यत्किंचित् सुद्धां तुह्मास त्रास न होई अशी तजवीज ठेवून आमच्या पट्टणाच्या कामाचा लाग साधेपर्यंत तुह्मास याच वाड्यांत राहूं देतों. मग पुढें तुमचें काय ह्मणणें आहे?

**चंपा**—(आपल्या मतलबास अनुसरून) आतां ह्मणायचं राहिलं काय? सगळं संपलंच! तुमच्या तरी बुवा शहाणपणाची शर्थ आहे!

**कृष्णाजीपंत**—हल्लींच्या काळांत प्रसंगास अनुसरून ज्याची वागणूक तोच शहाणा! कां खरें ना?

**चंपा**—नव्हे असं कोण ह्मणेल? (आर्जवानें) पंत, पाहरेकऱ्यांचा नेहमीं मेला कोण त्रास? सांगावं तितकं थोडंच!

**कृष्णाजीपंत**—तो कसा काय?

**चंपा**—काय सांगूं! पाहऱ्यावरचा तो जमादार असा कांहीं द्वाड आहे कीं बोलतां सोय नाहीं! तुमच्याकडून

सिधासामग्री, भाजीपाला सगळं येतं तें सुद्धां चांचपून पाहयचं! त्यांत हो काय याचं डोंबल असतं? दुधाद्ध्यांलासुद्धां तो मुसलमान शिवतो त्या खंतीनं आतांशा कोरडं अन्न खावं लागतं! करावं काय? बसून बसून कंटाळा आला तर वाड्यांतून इकडे तिकडे हिंडण्याफिरण्याची देखील चोरी! खिडक्यांतूनसुद्धां उभं राहतां कामा नये! सगळा वेळ दरडावून "उधर मत्त जाव, मत्त फिरो" हें आपलं त्याचं पालोपद आहेच! बायकामाणसांवर एवढा करडा बंदोबस्त हें नवल नव्हे का?

**कृष्णाजीपंत**—(मनांत) आजपर्यंत मींच असा बंदोबस्त ठेविला होता; परंतु हिची मर्जी राखण्याखातर आतां जरा सवलत देणें भाग आहे. (उघड) या जमादाराला काढून दुसरा एखादा गरीबसा पाठवून देतों, आणि आपल्यास बिलकुल त्रास न होईल असा बंदोबस्त ठेवितों ह्मणजे मग झालें ना? (मनांत) बायकांची जात चंचल तेव्हां हिचा निश्चय दृढ केला पाहिजे. (उघड) पण टिपूकडे जाण्याचा आपला दृढ निश्चय झाला आहे ना?

**चंपा**—कोण बुवा चमत्कार तरी हा! इतका वेळ चाललेली मसलत फुकटच का?

**कृष्णाजीपंत**—एकूण ठरलेंच तर?

**चंपा**—खचीत ठरलं!

**कृष्णाजीपंत**—अहो, पण पहिल्या दिवशींची तुमची स्थिति मनांत आणली तर ही गोष्ट या मजलेला येऊन पोहोंचेल हें स्वप्नींसुद्धां यावयाजोगें नव्हतें!

**चंपा**—कृष्णाजीपंत, तुह्मीच पाहा बरं? दुःख कुठपर्यंत राहणार? कांहीं दिवस मेली मनाला हळहळ वा-

टते. शेवटीं मन दगडासारखं आपोआप होतं ! एवींतेवीं मला त्यांनीं ओढून आणलं खरं व आतां हे सोडीत नाहींत असं ठरलंच, मग यांतल्या यांतच नको का सोय पाहायाला ?

**कृष्णाजीपंत**—( मनांत ) आतां मात्र पुरतें जुळलें. या मसलतींत खूप लाट लागणार ! ( उघड ) शाबास ! यालाच शहाणपण ह्मणावें. प्रसंग पडेल तसें जे वागतात, तेच या जगांतील सर्व सुखें उपभोगितात ! ही आपली ताबेदारी मी इमानेंइतबारें बजावितों. मात्र पुढें माझें विसरण न व्हावें एवढी पायांपाशीं विनंति आहे. ( हात जोडतो. )

**चंपा**—छेः ! हें हो काय ? वडील माणसांनीं लहानांपुढं हात का जोडायचे ?

**कृष्णाजीपंत**—( नेहमींप्रमाणें हंसत ) वयाकडे काय आहे ? जिकडे धनीपणा तिकडे मोठेपणा !

**चंपा**—पण हा धनीपणा तुमच्यापासूनच मला मिळणार ना. झालंच, संधी साधल्यास तुमच्या उपकाराची फेड तुमच्या योग्यतेनुरूप केल्यावांचून मी कधीं राहणार नाहीं. हवं तर हें घ्या माझं त्रिवार वचन ! आणखी जास्ती काय सांगूं ? ( मनांत ) जळ्ळा मेल्याचा उपकार ! पण करतां काय ? मतलबासारखं बोलावं लागतं !

**कृष्णाजीपंत**—पुष्कळ झालें. आपल्या शब्दावर माझा पूर्ण विश्वास आहे.

**चंपा**—आपापलं कल्याण जर करून घेणं आहे तर एकमेकांवर असाच विश्वास ठेवावा लागतो.

**कृष्णाजीपंत**—होय, तें अगदीं खरें आहे. आपलें देखील अद्याप जेवण झाल्यासारखें दिसत नाहीं.

**चंपा**—( कंटाळल्यासारखेंकरून ) जेवीन मेलं, त्याचं काय ?

**कृष्णाजीपंत**—स्वयंपाक तरी बरा करिते का ह्मातारी ?

**चंपा**—( मनांत ) अनायासं काम झालं. यांतच साळूला आणविण्याची गोष्ट काढावी. ( उघड ) करते झालं सरासरी. कुणबटच ती; जळ्ळी स्वच्छता कशी ती मुळीं नाहींच. त्यामुळें तिच्या हातचं जेवायला बघा किळस येतो. एरवीं आहे बरी.

**कृष्णाजीपंत**—एकूण आपल्याला आतांशा पोटभर जेवण नाहीं असें झालें. मग आमच्यासारखीं आपल्या ताबेदारीला माणसें असून काय उपयोग ?

**चंपा**—माणूसच मिळालं नाहीं, त्याला तुह्मी तरी काय कराल ?

**कृष्णाजीपंत**—होय, ह्मणूनच ही ह्मातारी धाडली. ह्मटलें सरासरी तरी तूर्त चालूं द्या.

**चंपा**—सवड निघाली तर माणूस मिळवून देण्याची खटपट करायला तुह्मी कमी करणार आहां का? असं कधींच व्हायचं नाहीं !

**कृष्णाजीपंत**—मला कांहीं बुवा सवड सुचत नाहीं. मी आपला घरचा स्वयंपाकी पाठवून देऊं का ?

**चंपा**—तुमचा स्वयंपाकी पाठविल्यानं, तुमची तरी तारांबळच होणार, शिवाय, पुरुष माणूस काय उपयोगी ? विटाळचंडाळ, दुखणंबाणं वगैरे असतं, तेव्हां जरा ओळखीचं बायको माणूस असलं ह्मणजे बरं नव्हे का ?

**कृष्णाजीपंत**—( खालीवर मान वेळीत ) होय होय, हें

काय विचारावें? तसें माणूस अवश्य पाहिजे, पण मिळतें आहे कोठें?

**चंपा**—मला एक सुचतं खरं, पण ती आतां सांपडावी कशी? त्या धांदलींत विचारी कुठं गेली का मेली कोण जाणे.

**कृष्णाजीपंत**—ती आहे कोण? सांगा तरी पाहूं, मी शोध करवीन.

**चंपा**—ती का? ती माझी कुळंबीण साळू!

**कृष्णाजीपंत**—साळू ना? ती मिळेल तर मग काय उत्तमच! मग आपल्या शुश्रूषेची मला काळजी करायला नको. पण ती आहे कोठें?

**चंपा**—मला तरी काय माहीत? येऊनजाऊन तिला एक मावशी आहे, ती तोरगलास राहते. तिच्याजवळ गेली असली तर नकळे.

**कृष्णाजीपंत**—तिकडे मनुष्य पाठवून शोध आणवितों तर.

**चंपा**—अनोळखी मनुष्य पाठवून ती नाहीं यायची. ह्मणून कोणीतरी माहितीचं मनुष्य पाठवा. त्याच्याजवळ मी खूण देईन, तिची ओळख पटली ह्मणजे ती येईल.

**कृष्णाजीपंत**—इथलाच संस्थानचा हुजऱ्या रामा, मीं इकडून पट्टणास जातांना बरोबर नेला होता तो अद्याप माझ्याजवळ आहे, त्याला पाठवून देईन, आपण खूण द्यावी.

**चंपा**—ही घ्या खूण. (देते.) "मी इथें वाड्यांत खुशाल आहें, पण माझ्या जेवणाखाणाची तारांबळ होते. ह्मणून तूं येच." असा माझा निरोप तिला कळवायला

सांगून युक्तीनं तिला आणायला त्या हुजऱ्यास ताकीद करा ह्मणजे झालं !

**कृष्णाजीपंत**—ठीक आहे. ही साळू आली ह्मणजे तिला आपल्यापाशीं ठेवावें, आणि पट्टणाकडील आपला बेत सिद्धीस जाईपर्यंत तुह्माला याच वाड्यांत राहूं द्यावें, हीं दोन्ही कामें त्या सय्यद बुऱ्हानुद्दिनाला कांहीं तरी थापा देऊन युक्तीनें साधून घेतों.

**चंपा**—यांत विशेष तें काय ? हें आपण सहजीं कराल. पण ती पट्टणची कामगिरी मात्र मोठ्या सावधगिरीनं आणि युक्तीनं चालवायला हवी, बरं का ?

**कृष्णाजीपंत**—त्याची आतां आपण काळजी द्या सोडून. ( छातीला हात लावून ) हा कृष्णाजीपंत आपल्या पायांपाशीं या मसलतींत यश घेतल्यावांचून राहील का ? ( किंचित् हंसून ) बरें मी येतों तर.

**चंपा**—ठीक आहे. या बोलण्याच्या नादांत तुमच्या जेवणाला मात्र उशीर झाला.

**कृष्णाजीपंत**—जेवण रोजचेंच आहे. अशी कामगिरी का वारंवार येते ? निरोप घेतों तर.

**चंपा**—बरं या. ( कृष्णाजीपंत गेल्यावर चंपा आपल्याशींच ) निम्मं काम तर भागलं. देवदयेनं साळू मात्र यावी ह्मणजे झालं. समुद्रांत तारूं फुटून बुडणारीं माणसं जशीं एखादी फळी धरून जीव वांचवून बाहेर निघतात, तसं मी आणि माझीं माणसं या संकटांतून पार कां नाहीं होणार ? कालच्या रात्रीच्या स्वप्नानं तर मला बाई फारच धैर्य आलं आहे. आई भवानी, माझ्या दादांना संस्थान पुनः प्राप्त होवो; आई, वहिनी, व माझा भाचा मला भेटो;

माझ्या कुंकवाचं आणि चुड्यांचं रक्षण होवो; आणि माझी व प्रियाची गांठ पडो; ह्मणजे मी हजार सवाष्णींना हळदी-कुंकवाचे पुडे वांटीन व खणांनारळांनीं त्यांच्या ओंट्या भरीन. बापा व्यंकटपति, देवा शंकरलिंगा, तुझ्या देवळासभोंवतीं लोटांगणं घालीन, महाभिषेक करवीन, व दोन सहस्र ब्राह्मणभोजनं पक्वान्नांचीं घालीन. ( हात जोडून देवाला नवस करिते. ) हे चार दिवस चार युगांसारखे गेले. असो, धीर धरायला हवा! जावं आतां आंग धुवायला. ( चंपा जाते. )

---

## प्रवेश दुसरा.

### स्थळ—सदर.

( चंपा प्रवेश करिते. )

**चंपा**—( आपल्याशींच ) साळूला बोलावणं जाऊन आज चार दिवस झाले. अजून कां बरं आली नाहीं? बोलावणं तरी गेलं असेल का? किंवा कृष्णाजीपंताच्या ह्या थापाच असतील! बहुतकरून तसं नसावं. कारण कृष्णाजीपंताला काल मीं जी चिठ्ठी लिहिली तिचं उत्तर आलं त्यावरून पाहतां साळू लौकरच येईल असं वाटतं. ( अशी विवंचना करीत उभी असतां साळू प्रवेश करिते. )

**साळू**—( चंपास मिठी मारून ) ताईसाब—( असें ह्मणून रडूं लागते. )

**चंपा**—साळू, रडूं नकोस. अग, मी इथं बंदींत आहें. बाहेर पाहरा आहे पाहिलास ना? तूं केव्हां आलीस?

**साळू**—ही बगा मी अशीच आलें. रामा हुजऱ्यानं हिंग अशीच आणून सोडली.

**चंपा**—खुशाल आहेस ना?

**साळू**—( दुःखोद्गारानें ) काय ह्मनतां ताईसाब ! अव, आमच धनी, तुमी, तुमच खास, हीं समदीं संकटांत पडून त्यांची येवस्था देवानं अशी लावलिया, आन् मी अवदसा खुशाल राहून काय उपयोग, ताईसाब ? ( मोठ्यानें रडूं लागते. )

**चंपा**—अग, अग, उगीच असा आक्रोश करूं नको. बाहेर पाहरा आहे ह्मणतें ना ?

**साळू**—काय करूं ताईसाब ! तुमचं तोंड बगतांच समदी आठवण झाली, आन् पोटांत बगा कसं भडभडून येतया.

( कृष्णाजीपंत प्रवेश करितो. )

**कृष्णाजीपंत**—( चंपाला मुजरा करून बसतो. ) तुमची साळू आली ना एकदांची !

**चंपा**—तुमच्या खटपटीनं आली.

**कृष्णाजीपंत**—( मनांत ) या साळूच्या संबंधानें त्या सरदाराला एक अक्षरसुद्धां कळविलें नाहीं हें खरें; तरी उपकाराचें ओझें इच्यावर लादलेलें बरें. ( उघड ) खटपट ह्मणून किती करावी लागली तें कांहीं पुसूं नका. तो सरदार मुसंडा गुलाम तुमची कुळंबीण तुमच्यापाशीं आणून दिल्यानें कदाचित् दोघी मसलत करून पळून जातील, यंव करतील, त्यंव करतील ह्मणून साळूच्या परवानगीबद्दल भारी आढेवेढे घेऊन नानातऱ्हेच्या कल्पना काढूं लागला !

**चंपा**—( जरा चपापून ) मग ?

**कृष्णाजीपंत**—मग काय ? त्याची अशी खातरी करून दिली कीं सांगतां सोय नाहीं !

**चंपा**—ती कशी काय ?

**कृष्णाजीपंत**—त्याला असें सांगितलें कीं "आपण चंपाताईबद्दल मनांत कसलेही संशय आणूं नका. जेव्हां जेव्हां त्यांजकडे मी जातों, तेव्हां तेव्हां त्या आपली खैरखुषी विचारीत असतात. दिवसेंदिवस त्यांचें मन आपल्याकडे ओढत चाललें आहे. तरी आणखी महिना पंधरादिवस लागणार. मग त्या आपल्या इच्छेस अनुकूल होतील."

**चंपा**—(मनांत) आग लागो मेल्या तुझ्या नि त्याच्या तोंडाला. (उघड रीतीनें जरा हंसल्यासारखें दाखवून) तुमची तरी बुवा शर्थ आहे. मग पुढं ?

**कृष्णाजीपंत**—असें सांगतांच गुलाम असा कांहीं खुलला आहे कीं तें कांहीं विचारूं नका! मग काय, मीं ह्मटलेलें कबूल! अशा आडदांड मूर्खांना युक्तीनेंच फसवावें लागतें. (हंसतो.)

**चंपा**—ठीक, असंच हवं! माणूस असावं तर अशाच कर्तुत्वाचं असावं. (मनांत) कांहीं का सांगेनास मेल्या, मला इथं चार आठ दिवस राहायला मिळालं ह्मणजे पुरे!

**कृष्णाजीपंत**—साळू आली, आतां मला आपल्याबद्दल काळजी करायला नको. मी निश्चित झालों.

**चंपा**—(आपल्या मतलबानें) मी देखील पुष्कळ पटीनं निश्चित झालें, बरं का ? आतां तेवढं तें काम केलंत ह्मणजे झालं.

**कृष्णाजीपंत**—(आपल्या मतलबास अनुसरून) तें पट्टणचेंच ना ?

**चंपा**—होय, आणखी दुसरं कसलं ?

**कृष्णाजीपंत**—द्या त्याची चिंता सोडून! माझ्या

अंगीं जी जी ह्मणून करामत आहे ती ती सर्व खर्चीं घालून आपलें काम मी फत्ते करीन. मग ताईसाहेब, या गरिबाचें विस्मरण मात्र न व्हावें ह्मणजे झालें.

**चंपा**—हें वरचेवर का सांगायला हवं ?

**कृष्णाजीपंत**—मीं आपली सहजीं आठवण दिली. आपण जशा कुलीन व थोर आहां तसेंच आपलें मन सुद्धां थोरच आहे ! हें पाहा, मला आतां गजेंद्रगड बदामीकडे जाण्यासाठीं त्या सरदाराचा हुकूम झाला आहे; आज रात्रौ जाऊन चार दिवसांत परत येईन.

**चंपा**—तिकडे कां बरं ?

**कृष्णाजीपंत**—( गुह्य मजकूर बोलण्याचा आव आणून ) त्या दोनी किल्ल्यांवर स्वारी करण्याचा टिपूच्या सरदाराचा बेत दिसतो ! हें मनांत ठेवायचें. दिवसेंदिवस हा टिपू पेशवे व निजाम यांचीं राज्यें दडपीत जाणार. कोपळचा किल्ला तर घेतलाच, सावनूरच्या नबाबाला दडपून ठेविलेंच आहे, नरगुंदची दुर्दशा उडालेली पाहतांच आहां. या सगळ्यावरून पाहतां पेशव्यांच्या देवाला सुद्धां आतां हा जुमानीत नाहीं हें खचीत आहे.

**चंपा**—उघडच दिसतं !

**कृष्णाजीपंत**—ताईसाहेब, साळूला आणून दिल्यावांचून मी गांवास जाईन असें तुह्मास वाटून चिठ्ठी लिहिलीत वाटतें ?

**चंपा**—केवळ असंच कांहीं नाहीं. आपल्या ठरलेल्या कामासाठीं आतांच श्रीरंगपट्टणास जात असाल आणि न भेटतां कदाचित् गडबडीनं जाल असं समजून आणखी

कांहीं सुचवायचं असल्यामुळं भेटून जाण्याबद्दल मुद्दाम चिठ्ठी लिहिली होती.

**कृष्णाजीपंत**—इकडील सरकारी कामें सोडून इतक्यांत आपल्या ठरलेल्या कामाबद्दल पट्टणास जाण्याची घाई करण्यांत अर्थ नाहीं. कारण टिपूच्या गोषांत जाण्याची आपली मनीषा असल्याबद्दल यापूर्वींच मीं मीर सादक वजिरास गुप्तपणें कळविलें असून आंतून खटपट चालविलीच आहे. ती खटपट सिद्धीस गेल्याची सूचना वजिराकडून येईपर्यंत दरम्यानच्या अवकाशांत सय्यद बुऱ्हानुद्दिन सरदारास इकडील प्रांत काबीज करण्याचे कामीं मदत देऊन ती शिफारस पदरीं पाडल्यानंतर (चंपाकडे हात करून) या आपल्या खास स्वारीचा नजराणा टिपूसुलतानाच्या पायांपाशीं नेल्यानें माझी जास्त वाहवा होऊन त्याच्या दरबारीं माझा चांगला पगडा बसणार आहे. अर्थात् जेथें माझें हित तेथें आपलें, आणि आपलें तेथें माझें! असा सगळा बेत असून इतक्यांत पट्टणास जाण्याची गडबड करण्यांत अर्थ नाहीं. (हंसतो.)

**चंपा**—होय, हेंही खरंच. (मनांत) मर मेल्या! तुझा हा सगळा बेत होण्याचे आधींच देवानं माझं गाऱ्हाणं ऐकावं आणि हा बंदिखाना सुटावा. (उघड) पण अहो, आमचीं माणसं जीं बंदींत आहेत त्यांची कशी काय वाट?

**कृष्णाजीपंत**—हीं तुमचीं सगळीं माणसें व्यंकटरावसाहेब व अमृतराव या उभयतांसहित उद्यां कैदेंतून श्रीरंगपट्टणास रवाना होणार!

**चंपा**—तिथं नेऊन यांचं करणार काय?

**कृष्णाजीपंत**—त्या टिपूचा बुवा नेम नाहीं. जिवा-

निशीं मारील किंवा बंदींत कुजत टाकील! वाटेल तें करील! आतां तुमच्या माणसांची आशा द्या सोडून! तो ग्रंथच आटपला. ज्या गांवास जाणें नाहीं त्या गांवची वाट आपल्याला हवी कशाला? कां, होय कीं नव्हे?

**चंपा**—(खिन्न होऊन) हो, तें तर खरंच. तुह्मी जाऊन येणार कधीं? तुह्मी इथं असलां ह्मणजे बरं असतं. लवकर याहो.

**कृष्णाजीपंत**—(खालीं वर मान वेळीत) होय होय, आपल्याला इथं सोडून मला तरी कोठून चैन पडणार आहे? होईल तितकें करून लवकरच येतों. जाऊं तर?

**चंपा**—बरं आहे. या. (कृष्णाजीपंत जातो.) (चंपा आपल्याशींच) हा गुलाम गांवास जाणार हें या समयास आपल्याला अनुकूलच आहे. कारण हा भलत्यासलत्या वेळेस इथं येत असतो. याची येण्याची आणि आपण बाहेर जाण्याची जर का एकच वेळ जमली, तर सर्वस्वीं घात होणार! तेव्हां हा परत येण्याचे आधींच आपला बेत पार पाडला पाहिजे. (चंपा जाते.)

---

## प्रवेश तिसरा.

### स्थळ—सदर.

(कुणबी तऱ्हेचें लुगडें नेसलेली चंपा प्रवेश करिते.)

**चंपा**—(हाताकडे पाहत आपल्याशींच) हे रुप्याचे गोट, हे विखुरलेले केंस, (खालीं लुगड्याकडे पाहून) हें कुणबी तऱ्हेचं लुगडं, या पोशाखावरून खचीत मला कुणी ओळखणार नाहीं असं वाटतं. डोईवरील पदराचा बुरखा जरा सरकून पुढं घ्यावा आणि खालीं मान करून मुका-

त्यानं रस्त्यांतून चालूं लागावं ह्मणजे झालं. आपला पळून जाण्याचा बेत एखादा फसल्यास आपली दुर्दशा कोणत्या थरास जाऊन पोहोंचेल याची जरी भीति वाटत आहे, तरी इथं राहणं आणि आपला बेत फसून फजीता होणं हें सारखंच. तेव्हां धैर्यानं न डगमगतां बंदमुक्त होण्याचा यत्न करावा हाच निश्चय. अपरात्रीं गस्तींत सांपडण्याची भीति असते; ह्मणून, आतां तिनिसांज तर झाली आहे, आणखी अमळशानं या अवशीच्या रात्रीसच बाहेर पडून जावं हें चांगलं. कुणब्याच्या बाया शेताशिवारांतून घरीं येतात व गुरंढोरं गांवांत येतात त्यांच्यांत आपणही मिसळून वाट धरावी. आजच्या रात्रींच हें नरगुंद सोडून बऱ्याच पल्ल्यावर गेलं पाहिजे. पुढं जाण्याची तरतूद प्रेमदासबुवानं कशी काय ठेविली आहे, त्याच्या शोधास साळूस धाडलीच आहे. ती परत येण्याची आपण आतां वाट पाहत बसूं. हो खरं, विसरलें; फडताळांतील सामानांतून आपल्याबरोबर काय काय न्यायचं तें बाहेर काढलं पाहिजे. (फडताळ उघडून जिनसा पाहत असतां एक चिठ्ठी बाहेर काढून) आपल्या साळूबद्दल मीं कृष्णाजीपंतास लिहिलेली ही चिठ्ठी आणि तिच्याखालीं हा त्याचा जबाब! (मागें पुढें उलटून वाचून पाहत) हें जरी सहजीं झालं आहे तरी यांतील संदिग्ध मजकुरावरून मी पळून गेल्यावर ही चिठ्ठी शत्रूच्या हातीं लागल्यास "कावळा बसायला आणि फांदी मोडायला एक गांठ पडली" ह्मणतात तशी गत त्या मेल्या कृष्णाजीपंतानंच मला पळविली असा संशय त्याच्यावर येण्याचा संभव आहे. आणि या संशयावरून एखादं त्याच्या प्राणावर सुद्धां येऊन बेतेल! बेतेना परतं! ही

चिठ्ठी जशाची तशीच मी येथून गेल्यावर सहजीं शत्रूच्या हातीं लागेल अशा बेतानं ठेवून निघून जावं. मेल्यानं मला थोडी का छळली आहे? त्याच्या करणीला योग्य असंच शासन त्याला हवं! हें सगळं खरं. परंतु आतांशा तो माझ्याशीं विश्वासानं वागत आहे अशांत त्याच्या प्राणांभोंवतीं येण्यायोगी जर मीं कृति केली, तर मग अंधारांत एखाद्याच्या पोटांत सुरी खुपसल्यासारखं किंवा गाढ झोंप लागलेल्या माणसाचा गळा कापल्यासारखं नाहीं का बरं व्हायचं? आणि हें असं कृत्रिम मजसारखीला योग्य होईल का? छेः! अशा तऱ्हेनं त्या मेल्याचा सूड उगविण्यापेक्षां देवावर हवाला ठेवावा हें बरं. तोच त्या मेल्याचं पारिपत्य करील! (इतक्यांत साळू येते तिला पाहून) अग बाई! आलीस का? सगळी तिकडची तयारी आहे ना?

**साळू**—प्रेमदासबुवा मठामंदीं समदी तयारी करून ह्मतारा बगा आपली वाटूच पाहत बसलाया.

**चंपा**—चल तर, आतां निघूंया. (पत्र हातीं घेऊन) तर आतां हें फाडून टाकावं परतं?

**साळू**—पत्र कुठलं ताईसाब?

**चंपा**—अग, हें बघ, मीं त्या कृष्णाजीपंतास तुला आणविण्याच्या संबंधानं लिहिलं होतं. आपण पळून गेल्यावर हें जर शत्रूच्या हातीं सांपडलं तर यांतील संदिग्ध मजकुरावरून त्यानंच आपल्यास पळविलं असा शत्रूंचा समज होऊन कदाचित् ते त्याचा प्राण सुद्धां घेतील. ह्मणून हें फाडून टाकावं ह्मणतें.

**साळू**—नग, नग, ताईसाब, फाडूं नका. (चंपाचे हातांतून चिठ्ठी घेऊन) या कागदानं त्याचं जर तळपट होतया

तर खुशाल होऊं द्या. आयतं काम झालं. कागद हतच ठेऊनशानी जाऊंया.

**चंपा**—छेः ग, मरेल बिचारा !

**साळू**—अन् त्यो होगाडला ह्मनुन त्यांत वावगं काय ? समदा लोक ह्मनतो की हा किष्णाजीपंत अन् तो तोरगळचा काजी यांनींच सत्रूला भेद देऊनशानी आपलं संस्थान बुडिवलं ! अन् तुमासनी मुसलमानाच्या गोशांत घालन्यापाई तुमचा कोण छळ त्यो ! खाल्लचा घरच वांस मोजणारा गुलाम ! मेल्याचं तळपट होऊं द्या ! ( कपाळापुढें दोनी हात आणून बोटें मोडते. )

**चंपा**—अग साळू, हें सगळं खरं ! पण अशा कृत्रिमानं त्याचा घात करून मीं आपल्या शीलाला डाग लावून घेणं चांगलं का ?

**साळू**—काय ह्मंता ताईसाब ! अव, ज्यानं आपलं वाईट केलं त्याला सवड गावली कीं हात दाखवावाच बगा !

**चंपा**—अग साळू, करील तो भरील. कदाचित् शत्रूंनीं आणि जर का त्याचं डोकं मारलं तर त्या हत्त्येचं पातक माझ्या माथीं नाहीं का येणार ? नको रे देवा तें ! आपल्याला या बंदींतून सुटून जाणं आहे, तेवढं साधून घेऊं ह्मणजे झालं.

**साळू**—( मनांत ) यांच्याशीं वादाडत बसण्यापेक्षां आपुन आपलं इगतीनं काम करून घ्यावं अन् काय ! ( उघड ) ताईसाब, तुह्मी ह्मंता तेबी खरंच.

**चंपा**—झालं तर, आण तें पत्र इकडे. फाडून टाकतें परती.

**साळू**—नका ताईसाब फाडून टाकूं. अव बगा, हे

तुकड त्यांच्या हातीं गवसल ह्मणजे वाचून बगतिला. चुलींत इस्तुव हाय जाळून टाकतें अन् काय?

**चंपा**—बरं तर, तसंच कर. मी इतक्यांत पाणीबिणी पिऊन येतें. लवकर निघूं आतां, दोन घटका रात्र झाली असेल. (चंपा जाते.)

**साळू**—(आपल्याशींच) भला गवसला रांडल्योक माझ्या हातीं. दरबारामंदीं कावळ घातल ह्मंजे त्ये हटकून हडूक अन्नारच! या मेल्याच दरबारांत पाय लागल तेवांच गुलामानं अक्शीं सत्यनास केला. आप्पा कारभाऱ्यांसनी चाडी सांगसांगून समद्या कारकुनांसनी मागं टाकलं अन् आपलाच टेंबा मिरवूनशानी, पागचा, पंक्तीचा, नी थट्टीचा खरूच कमी केला, अन् अदुगर आमचा कुनबिनींचा शेर तोडला. असं करूनशानी मेल्यानं शेंपन्नास लोकांच्या पोटावर पाय दिला. त्येबी राहूदे, पन चंपाताईच्या लगनामंदीं मोत्यांचा कंठा हरवला अन् त्येबी बालंट अमा कुनबिनींवर आनून समद्यांसनी पाट सुजइतकं मा मारून घेतलं. मला तर तीन वार पाठ शेकून ध्येवी लागली. अन् कंठा गावला भलतीकडच. एवढा हा संस्थानचं हित करनारा गुलाम, शत्रूला फितूर होऊनशानी, गुलामानं संस्थान कां बुडवून टाकलं? आं? कां बुडविलं? लुच्चा मेला! तोंडपुंजा! हित करनारा ह्यो? बुडव्या! आतां काडतें याचं वट्ट काम! (पत्र हातीं घेऊन) हा कागद ताईसायबांच्या लुगड्यांच्या पेटीमंदीं ठेवतें. अन् उद्यां परवां या गुलामाचा तमाशा कसा होतो तो पाहतें, शेवटीं ऐकेन तर खरी. (पत्र पेटींत ठेवते. चंपा प्रवेश करिते.)

**चंपा**—अग साळू, ही झाली माझी तयारी बरं? चल आतां कुणीकडून नेतेस ती ने.

**साळू**—ताईसाब हे बगा, आपनासनी न्हाऊं घाला-यचं हाय ह्मनून पारेकऱ्यांसनी सांगून सदरेच्या अन् भो-ईखान्याकडच्या दारांसनी आंतून कड्या लावून घेतल्या हैता. आंत कोणबी नाहीं यायचा. आतां अपून बगा, मागल्या चौकांतून होऊनशानी चोरदिंडीनं पागंत जाऊं. पागा तर हतून तिथून वसाड पडली हाया. चिटपाकरूसुद्धां तिथं नाहीं. तिकून हंग तसंच लिमयांच्या दारावरूनशानी लस्करपेटेमधून थोरल्या रस्त्यानं पडगुंडावरून प्रेमदास-बावाच्या मटामंदीं जाऊं बगा. ध्या ते टोपलं डोक्याव-रती, हें गाटूल मी घेतें, जशा का कुनब्यांच्याच बाया अक्शि चाल्या जनू, असं बगनारांसनी वाटावं. (चंपा डोक्यावर पांटी घेते ती पाहून) देवा ! देवा ! ! काय ह्यो वन-वास ! (रडूं लागते.)

**चंपा**—हें कायग साळू, असं करण्याची ही वेळ का ? चल मुकाट्यानं.

**साळू**—(डोळे पुशीत) चला तर.

(दोघी जातात.)

---

## प्रवेश चवथा.

**स्थळ**—नरगुंदकरांचे वाड्यांतील सदर.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—देखीये सय्यद, आज चार पांच दिनसे चौतर्फ सवारलोक धूंडधूंडके बेजार हो गये हैं. लेकिन् अबतक् चंपा औरतका पत्ता नहि मिलता, ये बडी ताजूब[1]की बात है.

---

1 ताजूब=अचंबा.

**सय्यद गफूर**—उसपर कृष्णाजीपंतकी निगाहबानी[1] थी. उसने, उसकों भगाकर कहीं छूपा दिया होगा. क्यौंके उस औरतने कृष्णाजीके नामसे लिखीसो रुक्का[2] जो मिला है, उसका मतलब तो मुतलक[3] येही है.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—ये बात तो साबीत हुई है. लेकिन्, उस हरामखोर कृष्णाजीको लानेकेवास्ते बदामी और गजेंद्रगड तर्फ जो सवारलोग गये हैं, वे उसको पकडके लायेबाद कुल अहवाल उससे जाहेर होगा.

**सय्यद गफूर**—खुदावंद, ओ काफिर जातका बम्मन है. उस्से ये हकीकत मालूम होनी बहोत मुषकिल है.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—(संतापून) क्या बोलते हो सय्यदसाहेब ? (कटार उपसून) अगर, ओ उस औरतका पत्ता कभी न देंगा तो देखो, मै इस खंजेरसे[4] उसका पेट चाककेर[5] डालूंगा ! ताके, उसका अंदरका फरेब[6] बाहेर निकल आवे ! (इतक्यांत कृष्णाजीपंतास आणून उभा करितात.) बहोत अछी बात है ! शुकरे खुदा ! वह बदमाश आगया. (दाढीवरून हात फिरवीत कृष्णाजीपंतास) ऐ हरामखोर, ओ चंपा औरत किदर है बोल.

**कृष्णाजीपंत**—(कांपत, दीनवाण्या मुद्रेनें) महाराज, मी जातांना ती या वाड्यांतच होती.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—अब कहां है? किदर भगादिया ?

**कृष्णाजीपंत**—सरकार, मीं तिला पळविली नाहीं; आणि आतां कोठें आहे हेंही मला माहीत नाहीं.

---

१ निगाहबानी=देखरेख. २ रुक्का=चिठ्ठी. ३ मुतलक=खरोखर. ४ खंजर=कटार. ५ चाककर=चिरून, फाडून. ६ फरेब=कपट.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—क्या देखते हो मिया ज-मालखां? इस बदमाशको धक्के मारो; ताके सच्ची बात कहे. (धक्के मारतात.)

**कृष्णाजीपंत**—नाहीं सरकार, मला कांहींच ठाऊक नाहीं. माझ्या मुलाबाळांची शपथ, मी तिला पळविण्याचे पापांत नाहीं. मर्जीस आल्यास सरकारांनीं मजकडून तापलेल्या तेलांतून रवा काढवावा.

**सय्यद गफूर**—ऐसी झूटी इकरार[1] करनेके काममें ये हिंदु काफीर बडे हुशियार होते हैं. हातोंको कुच जडीबूट्टी लगाकर आगमे हात डालनेकेवास्ते ये तय्यार होके आया है. सो उसकी हिकमत, मै खूब जानताहूं, सरकार!

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—(रागानें) ऐ बदमाश, ये गौडबंगाल खेल तुझसे हम देखनेकेवास्ते नहीं चाहते हैं! हरामखोर, चंपा कहां है बताव.

**कृष्णाजीपंत**—सरकार, तिच्याबद्दल खरोखर मला कांहीं ठाऊक नाहीं. मी जातांना नेहमींसारखा तिच्यावर बंदोबस्त ठेवून गेलों होतों, पुढें काय झालें तें मला बिलकुल ठाऊक नाहीं.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—ऐ काफीर, तू खूब दिलमें गौर[2] करके बोल, के, तेरे और उसके दरम्यान चिठ्ठी वगैरेकी बाबत साबिती हुई तो तुझको कौनसी सजा देनी चाहीये?

**कृष्णाजीपंत**—(विचार करीत मनांत) मीं तिला कशाबद्दलही कधींच पत्र वगैरे लिहिलेलें या वेळेस तरी मला

१ इकरार=शपत. २ गौर=विचार.

आठवत नाहीं. शिवाय मीं तिला पळविली नाहीं, व पळविण्याच्या खटपटींतही नाहीं, याविषयीं माझी मनदेवता साक्ष देत आहे. होईल तें होवो, स्पष्ट सांगावें ह्मणजे या आडदांड मूर्खांची खातरी होईल. ( उघड ) खुदावंद, आपल्या सरकारांनीं मजवर भरंवसा ठेवून आजपर्यंत माझ्याकडून मोठमोठीं महत्त्वाचीं कामें घेतलीं; अशांत जर मी सरकारचे पायांपाशीं निमकहरामपणा केला ही खातरी सरकार ह्मणतं अशा पुराव्यानिशीं झाली तर, सरकारांनीं खुशाल माझें डोकें मारावें !

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—( सकोप हास्य करून ) वाहवा ! बहोत अछी बात है. इसकी जुबानपर ख्याल कीजिये, सय्यदसाहेब ! ( कृष्णाजीकडे ) अरे बदमाश, चंपाको उसकी बांदी बगर हुकूमके तूने लादिया या नही बोल.

**कृष्णाजीपंत**—( कांपत, तुटक शब्दांनीं ) सरकार, हात जोडून माफी मागतों ! आपण मायबाप आहांत, खरी हकीकत सांगतों, ऐकावी. तिची सर्व प्रकारें बरदास्त ठेवण्याविषयीं खावंदांचा सख्त हुकूम मला असल्यावरून तिचे जेवणाखाणाचे भारी हाल होत होते याकरितां तिची कुळंबीण मीं तिला आणवून दिली हें खरें आहे.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—जाहन्नमे[1] जाव ! जमालखां, इदर कोई है ? मुकुंदराव पंडतको बुलाव.

**जमालखां**—जो हुकूम. ( असें ह्मणून जाऊन मुकुंदराव यांस आणितो. )

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—( मुकुंदरावाचे हातीं पत्र देऊन ) अजी पंडत ? ये रुक्का पढो.

---

१ जाहन्नमे जाव=मष्णांत जा, नरकांत जा.

(मुकुंदराव पत्र वाचतो.)

"राजश्री कृष्णाजीपंत यांस चंपाबाईचा अनेक दंडवत. विनंति आषाढ वद्य १४ पावेतों क्षेम असों विशेष. आज चार दिवस गांठ नाहीं. इतक्यांत तुह्मी गांवास जाणार ह्मणून ऐकिलें. आपल्या ठरलेल्या कामासच जात असाल तर त्या संबंधानें मला आणखी कांहीं युक्ति सुचली असून दोन शब्द तुह्मास समक्ष कळविण्याचे आहेत, अगत्य येऊन भेटावें. आपला डाव पुरता साधेपर्यंत तुह्मी नसतांना मला एथें एकटीसच राहणें धोक्याचें होईल. तर समक्ष ठरल्याप्रमाणें आधीं साळूस आणवून देऊन नंतर जावें. ह्मणजे तुमची गांठ पडेपर्यंत आपल्या संकेताप्रमाणें निश्चित राहीन. शिवाय साळू आल्यानें खाण्यापिण्याचे हाल सुटतील. पंत, आपल्या उपकाराचें ओझें डोकीवर फार झालें आहे याची फेड या हातानें होईल तरच मी भाग्याची. अगत्य यावें, लोभ करावा हे विनंति."

"सेवकाची विनंति—साळूस आणण्यास धाडलेला मनुष्य अद्याप परत आला नाहीं. तिला आणण्याबद्दल पक्का बंदोबस्त केला आहे. आज उद्यां इतक्यांत खचीत येईल. तिला आणवून देऊन नंतर मी जाईन. काळजी नसावी. बाकी मुक्का कळेल. सेवकाचे उपकार मानणें नलगे. हे विनंति."

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—(कृष्णाजीस) अब इसपर तेरा कहना क्या है बयान कर.

**कृष्णाजीपंत**—(खालीं बसून सुस्कारा टाकीत आपल्याशींच) अरे देवा! देवा!! चिठ्ठीबद्दल मला मुळींच स्मरण नव्हतें! ही चिठ्ठी यांच्या हातीं मिळाली काय?

आपला तिचा संकेत निराळ्या मतलबाचा होता. त्यावर भरंवसा ठेवून मीं तिच्या चिठ्ठीस सरळ मनानें जबाब दिला. त्याचा अर्थ आतां हे विपरीत करणार आणि माझा प्राण घेणार ! आतां मात्र माझी नव्याणवी खचीत भरली ! पत्रांतील संदिग्ध मजकूर पाहिल्यास हें तिनें मुद्दाम मला कपटानें कां लिहिलें नसावें ? कारण, पत्राचे शेवटीं ती ह्मणते–'उपकाराचें ओझें माझ्या डोकीवर फार झालें आहे याची फेड या हातानें होईल तरच मी भाग्याची.' खरें ! समजलों ! पुरतें समजलों ! सटवीचें कपट आतां माझ्या लक्षांत आलें ! मीं तिजबद्दल केलेल्या कृतीचा उपकार ती ज्या अर्थानें समजते तशा उपकाराची फेड या तिच्या हातचे लेखावरून होणार खचीत ! अवदसे, उजळले तुझे हात ! फिटला उपकार ! तुझ्या हातचा लेखच मला ठार करणार ! मग झालीस भाग्याची ! (क्षणिक वैराग्य येऊन) पण, तिला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ? (स्फुंदस्फुंदून डोळे पुसतो.) करायला गेलों एक आणि झालें भलतेंच ! आपस्वार्थाकरितां या मुसंड्यास खुष करण्याचे इराद्यानें त्या बापडीचा थोडा का मीं छळ केला ? 'या कलियुगांत एका हातानें करावें आणि दुसऱ्या हातानें भरावें' अशी परंपरा ह्मण आहे ती खोटी नव्हे. आतां केल्या कर्माचें फळ भोगलें पाहिजे. (पुनः मूळस्वभावास अनुसरून) परंतु ती तरी कृत्रिमी कमी काय ? अरे, अशा यःकश्चित् स्त्रीनें या शहाण्या ह्मणून नांवाजलेल्या पंतास फसवावें काय ? बायकांचा अंत लागत नाहीं ह्मणतात हें कांहीं खोटें नव्हे ! कशा उलट्या काळजाची बायको पण ! कोण धारिष्ट हें ! सटवी बंदींत

ठेविल्यापासून माझ्या मनाजोगतें गोड गोड बोलून माझ्या पोटांत शिरली! टिपूच्या गोषांत जाण्याची खोटी इच्छा दाखवून या वाड्यांत राहिली! नानातऱ्हेच्या मला आशा दाखवून तिनें युक्तीनें आपली साळू कुळंबीण आणवून घेतली! आणि शेवटीं आपला आपण बेत करून पळून जाण्याचें तें जाऊन, तें अपेश! तें भयंकर बालंट! माझ्या गरिबाच्या माथीं आणून ठेविलेंन् ना? या पत्रांतील मजकुराची बिनाखी हीं आडदांड माणसें कोठून करणार? या पत्रांतील मजकुरावरून तिचा माझा कांहीं संकेत होता, आंतून तिला माझी फूस होती, आणि मींच तिला पळविली, अशी यांच्या मनाची खातरी होऊन हे मूर्ख मला ठार करणार! यांतून वांचण्यास मार्ग दिसत नाहीं हें खरें आहे. तथापि नाकाशीं सूत धरलें असतांही वैद्याकडून इलाज करविण्याची आशा जशी सुटत नाहीं, तद्वत् जरी कंठगत प्राण आला आहे तरी जगण्याचा इलाज शोधून काढला पाहिजे. नाहींपेक्षां निमूटपणें बसून राहीन तर व्यर्थ मरून जाऊन आजपर्यंत शहाणपणाबद्दल जी कीर्ति मिळविली आहे तिला हरताळ लागणार! तेव्हां पत्राबद्दल कांहींतरी शक्कल काढून, तें पत्र व त्यांतील जबाब हीं अजीबात नाकबूल केलीं पाहिजेत!

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—अरे बदमाश, गरदन नीचे डालकर क्यौं बैठा है? चंपाको कहां छुपा रखा? इस घडी लाके हाजर कर, नही तो याद रख, तेरा सर तनसे उतारा जायेगा.

**कृष्णाजीपंत**—सरकार मी काय सांगूं! (आक्रोशानें रडूं लागतो.) या वेळेस मीं कांहीं जरी सांगितलें त-

थापि आपली खातरी होणार नाहीं. ती लबाड स्वतःच बेत करून पळून गेली आहे, आणि माझा गळा कापण्याचे हेतूनें बुच्या ही चिठ्ठी माझ्या नांवची तिनें लिहिली आहे, आणि त्याखालीं जबाबही तिनेंच लिहिला आहे. सरकार, आपण मोठे विचारी आहां, न्यायी आहां; तेव्हां ही चिठ्ठी कोठें होती, कशी मिळाली, सरकारचे हातीं कोणीं आणून दिली याविषयीं खावंदांनीं चांगली चौकशी करावी, ह्मणजे मी ह्मणतों त्याची खातरी होईल.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—( आवेशानें तलवार उपसून ) ऐ बदमाष, निमकहराम ! उसने तेरी गर्दन नहि काटी; लेकिन् जिसके इषकमे मेरा दिल दिवाना होकर, आजतक तेरे इस बातपर एतबार रखकर रहाथा के, ओ अब आयेगी, कल आयेगी, या चंदरोजके बाद मेरे डेरेमे आयेगी, उस औरतको, मेरे गुलाबको ! आखिर तूनें मुझसे दगाबाजी करकर भगाकर, मेरी गर्दन तूने काटी. ऐसी नादानी करके, ऐ हरामखोर, अब तू मुझसे पूछता है के, चिठ्ठी किस तौरसे मिली, और कहां मिली ? क्यौं ? ( कृष्णाजीचे दंडास धरून ) बदमाश ! चल, ऊठ, चिठ्ठीकी साबिती कैसी हुई है अब तुझे बताता हूं ! ( कृष्णाजीपंताच्या मानेवर तलवार उगारतो इतक्यांत त्याचा हात सय्यद गफूर धरतो. )

**सय्यद गफूर**—जनाब, बडेबडे जबरस्त दुशमन् सिपाहीओंकी खबर जंगमे लेनेवाली आपकी जो शमशीर है, वैसी शमशीरको, इस हरामखोर काफिरके खूंनसे[1] नापाक करना मुनासिब नहीं. और सरकारने जिस का-

---

१ खून=रक्त.

मपर इसको भेज दिये थे, उस कामकी बाबत क्या इं-तेजाम[1] करके आया है, यह अवल उससे पूछ लेना.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—अरे हरामखोर, गजेंद्रगड और बदामी इन् दोनो किलोंकी बाबत तूने क्या किया सो बयान कर.

**कृष्णाजीपंत**—(मनांत) जीव जगण्याची आशा आहे काय? (उघड) सरकार, आपण फौज घेऊन जाण्याची फुरसत, दोन्ही किल्ले हस्तगत व्हावे अशी हिकमत करून आलों आहें. मर्जीस आल्यास माझ्या बरोबर आलेल्या देसाईदेशपांड्यांकडून खातरी करून घ्यावी. खावंद मी सरकारचे ताबेदारींत खरोखर निमकहलाल आहें.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—(सय्यद गफूर यास) सय्यदसाहेब, आप अलग जाके उन जमीदार लोगोंसे अपनी खातरजमी करके जलदी लोटे[2] आना.

**सय्यद गफूर**—जो हुकूम. (आंत जाऊन बाहेर येतो.) सरकार, मैंने खातरजमी करलिये, बम्मन बहोत अछी हिकमत करके आया है इसमे कुच शुबा नहीं.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—सय्यदसाहेब, ये काफीर कृष्णाजीके बाबतमे मेरा दिल बहशत् जदा[3] हो गया है! क्यौं के, देखीये, जंगमे गिरफतार किई हुई औरतको भगाके ऐसी सरकारकी गुन्हेगारी कीहै के इस घडी इसको कतल करना लाजीम[4] है. और अब जिन् किलोंपर हमला करनेको

---

१ इंतेजाम=बंदोबस्त. २ लोट=परत. लोट आना=परत यावें. ३ बहशत् जदा=द्विधा; मेरा दिल बहशत् जदा हो गया है=माझें मन द्विधा झालें आहे. ४ लाजीम=जरूर.

हम् चाहते हैं वे किले, आपने हातमे मिल जानेके लिये अछी हिकमत करके आया है, ये काम उसका लायक इनाम है. ये दोनो बातों ध्यानमें लाकर इसका फैसला किस तौरसे करना ये हमारे ख्यालमें आता नहीं. इस-लिये, आप इस मोकद्दमेका इनसाफ करके इस घडी फै-सल्ला कर दीजीये. लेकिन्, इतना ख्याल करना चाहि-येके, उसके अछे फेलसे[१] कुसूर[२] उसका जियादा है.

**सय्यद गफूर**—( विचार करीत दाढीवरून हात फिरवीत ) सुभानल्ला ! हुजूर, बंदेने खुब अपने दिलमे गौर किया. मगर इसकी दानाई और नादानी, ये दोनो एक ठिकाने आके ठेरी है. इसलिये, मुनासिब ऐसा दिखता है के, एकमे जानकी हिफाजतका[३] रस्ता रखकर, दुसरीमे जान लेनेकी सजा फरमाना. आयंदा[४] जो हुकूम.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—( साश्चर्य ) क्या बोलते हो, सैय्यद साहेब ? जान लेना, और बचाना ऐसी सजा एकी शक्स पर एकी वक्त कैसी अमलमे आवेगी ? ये बडी तांजूब[५] की बात है.

**सय्यद गफूर**—मैने वैसीही हिकमत निकाली है.

**सय्यद बुऱ्हानुद्दिन**—अछा, बोलीये ?

**सय्यद गफूर**—सुनीये सरकार. ( कृष्णाजीकडे हात करून ) इस शक्सने चंपा औरतको भगादिया, ये निमक-हरामी बगर गँवाहीसे[६] फक्त ये रुक्केपरसे साबीत होती है. इस गुनाहके मुकाबिल, गजेंद्रगड और बदामी इन्

---

१ फेल=काम; अछे फेलसे=चांगल्या कामापेक्षां. २ कुसूर=चूक, अपराध. ३ हिफाजत=बचाव. ४ आयंदा=पुढें. ५ ताजूब=आश्चर्य. ६ गवाही=साक्ष.

किलोंके बाबतकी शिफारस बहोत कुच फायदा करती नहीं. इसलिये तनूसे सर उडा देनेकी और गधेपर बिठाके ये नरगुंदमीतर धिंड फिरानेकी, ये दोनो सजा ये बदमाश कृष्णाजीको सुना दो. उनमेसे ये हरामखोर कौनसीभी सजा खाइश[1] करेगा सो अमलमे लाना.

**सय्यद बुऱ्हानुदिन**—वाहवा! शाबास! आप् जैसे दानीषमंद और जीरक[2] हकीम[3] टिपुसुलतान बहादूरके दरबारमे मैवजूद[4] हो, इस लिये इस रियासतकी रयतको अदल[5] इनसाफ बराबर मिलता है. सय्यदसाहेब, आपने इस मोकदमेका इनसाफ बखूबी[6] किया. मगर उसकी तामील[7] अब इस बदमाश कृष्णाजीके गर्दनपर रह गई है. (कृष्णाजीस लक्षून मोठ्यानें) ऐ हरामखोर, जलदी बोल धिंड चाहता है या सर[8] देता है?

**कृष्णाजीपंत**—(आपल्याशींच) गुलामांचा कोण न्याय? यांच्या फायद्याकरितां मीं आपल्या जातीकडे, देशाकडे, धर्माकडे, व ज्या धन्याचें अन्न आजवर खाल्लें त्या धन्याकडे नजर न देतां यांना योग्य व वेळेवर सल्लामसलत देऊन हें ब्राह्मणी संस्थान बुडविलें; आणि पुन्हा बदामी व गजेंद्रगड या दोन्ही किल्ल्यांबद्दल जातीनिशीं तिकडे जाऊन, देसाई, देशपांडे, किल्लेदार वगैरे लोकांस नाना तऱ्हेंच्या थापा देऊन त्यांचीं मनें वळवून दोन्ही किल्ले यांचे स्वाधीन होण्याची खटपट करून आलों. अशा या उपकाराबद्दल, हे मला या प्रांताचा सरसुभा दे-

---

१ खाईश=पसंद. २ जीरक=अक्कलवान. ३ हकीम=विद्वान्; सर्वविद्यापारंगत. ४ मवजूद=हजर. ५ अदल=न्याय. ६ बखूबी=उत्तम. ७ तामील=अमल. ८ सर=डोकें.

ऊन वर जहागीर देतील, ही आजवर मला मोठीच आशा होती, परंतु हे कृतघ्न गुलाम त्या कर्मचांडाळणीच्या नुसत्या त्या चिठ्ठीवर भरंवसा ठेवून माझी मान तोडणार, किंवा गाढवावर बसवून माझी धिंड काढणार! वाहवारे न्याय! शिवाय हे कसे वेडे पीर आहेत पाहा! पेशव्यांचे मुलुखांत स्वारी करण्याचे कामीं यांना अद्याप मजकडून पुष्कळ कामें करून घेण्याचीं होतीं; त्यांकडे तरी यांनीं लक्ष द्यायाचें होतें! मरोत गुलाम! त्याचें आपल्यास काय कर्तव्य आहे? तूर्त आपल्या प्राणांभोंवतीं आलें आहे ह्याचा आपण विचार करूं. आतां, जिवाकडे पाहवें तर अब्रू जाते! अब्रूकडे पाहवें तर जीव जातो! हर हर! देवा! केवढें संकट हें! या नरपशूंस जबाब तरी काय द्यावा? कांहींच सुचेना! बरें, अब्रू अब्रू ह्मणून व्यर्थ डौल मारीत बसेन तर, एका क्षणांत मुंडकें जमिनीवर कसें लोळत पडणार हें आतांपासूनच माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागलें आहे! (कांपूं लागतो.) शिव शिव! कोण भयंकर प्रसंग हा! हा प्राण निघून गेल्यावर माझें पेट्यांच्या पेट्या भरून ठेवलेलें द्रव्य, माझी स्त्री, माझे मुलगे, माझें घरदार, या सगळ्यांस मी मुकणार ना? (डोळ्यांचें पाणी पुशीत) छी! छी! छी! नको नको ती मला अब्रू. सिर सलामत तो पगडी पचास! हा प्राण वांचला तर दुनया कांहीं ओस नाहीं. दोन चारशें कोस लांब जाऊन पुन्हा दुसऱ्या एखाद्या रियासतींत शिरून आपल्या करामतीनें पुन्हा हवी तितकी अब्रू मिळवितां येईल. आतां हे गुलाम माझ्या तोंडाला काळें फांसून तीन पाट काढणार! काढूं द्या. गाढवावर बसविणार! बसवूं द्या. गळ्यांत कांद्यांची माळ घालणार! घालूं द्या. गुलामांस काय वाटेल

तें करूं द्या. नरगुंद कांहीं मोठें शहर नाहीं, तास दोन तासांचें काम; जरा चालकर गाढव मात्र असला पाहिजे, डोळे झांकून त्यावर स्वार व्हावें ह्मणजे झालें, तेव्हांच हिंडून येईल.

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—अरे बदमाश, क्यौं चुप बैठा है? बोल धिंड चाहता है, या सर देता है? मै जानता हूं के, तूं शायद सर देनेकूं तयार हुवा है. जल्द बोल. तेरे मावापका नाम ले और खुदाको याद कर, मांग लोग बकशीसका रस्ता देखते हैं, जल्द बोल.

**कृष्णाजीपंत**—खावंद, मीं मरून माझें डोकें मारल्याबद्दल मांगास बक्षीस देववावें व अशारीतीनें खजीन्याचें व्यर्थ नुकसान करवून सरकारचा ऋणी व्हावें यापेक्षां जीवंत राहून खावंदांची आणखी चार दिवस तावेदारी करून माझे कर्तबगारीचा फायदा आपल्या सरकारास द्यावा या हेतूनें मी धिंडच पसंत करितों, महाराज!

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—शाबास! शाबास! औरभी ये सरकारके ताबेदारी करनेको चाहताहै क्या? अच्छा! जमालखा, इसको लिजाके दस्तूरके मुवाफिक इस नरगुंद भीतर धिंड फिराके, फेर इसको मुल्लाके यहां लेजाकर सुंता करवाके मुसलमान बनाव. मुसलमान होनेसे ये बदमाश इमानदार होगा! चलो, निकालो सामनेसे.

**कृष्णाजीपंत**—नशीब! या गुलामांची ताबेदारी पुनः करतों ह्मटलें ह्मणून धिंडेशिवाय ही सुंता कपाळीं आली! अस्तु, जिवावर आलेलें शेंपटीवर गेलें.

(कृष्णाजीपंतास नेतात.)

**सैय्यद बुऱ्हानुद्दिन**—(सैय्यद गफूर यास) अब च-

लीये सैय्यद साहेब, ताके गजेंद्रगड और बदामी इन् दोनो किलोंपर हमलेकी तयारी करें.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश पांचवा.

### स्थळ—नरगुंद येथील एक मशीद.

( एक मोठें चक्रीदार व वेडेवांकडे पेंच मारलेलें पागोटें घालून मुसलमानी पोषाखानें कृष्णाजीपंत प्रवेश करितो. )

**कृष्णाजीपंत**—( आपल्याशीं ) "दैवी विचित्रा गतिः" ! ही दैवाची गति ह्मणावी किंवा आपल्या ज्ञानाची फलप्राप्ति ह्मणावी ? पाहा, मी मूळचा होतों उत्तरेकडील कायस्थ, त्याचा झालों ब्राह्मण कोंकणस्थ, पुढें झालों वैष्णव देशस्थ, आणि आतां बनलों आहें मुसलमान जबरदस्त. एकूण हे चार आश्रम झाले तरी यावत्कालपर्यंत या बच्चाजीनें आपल्या खऱ्या जातीचा कोणास तरी मागमूस लागूं दिला आहे काय ? याचें नांव शहाणपण ! परंतु मुसलमान झालों हें मात्र जघन्य असेल अशाविषयीं मनाला थोडेंबहुत खात आहे. तथापि, पुनरपि पूर्वीच्या त्याच ज्ञातींत, किंवा जेथें फायदा होतो असें वाटेल अशा दुसऱ्या एखाद्या ज्ञातींत केव्हांच शिरून, ही मनाची मळमळ काढून टाकतां येईल. हें देखील आपल्या आंगचें कर्तृत्व कांहीं साधारण नव्हे. तसेंच कसेंही जात्यंतर केलें तरी तें फायद्याबगर केलें नाहीं आणि कितीही भयंकर प्रसंग या देहावर आले तरी जीव आणि द्रव्य हीं दोन्ही वांचवून हा बच्चाजी त्यांमधून पार झाला आहे हें कांहीं सामान्य नव्हे ! या सर्व गोष्टींवरून पाहतां, दैवाच्या गतीपेक्षां आपल्या ज्ञानाची फलप्राप्तिच निःसंशय जास्त

असें झालें. आतां, कांहीं कारणांवरून जन आपल्यास निर्लज्ज ह्मणत असतील अशी शंका येते; पण जनाच्या तोंडास तरी हात लावणार कोण? कारण जन त्रिविध आहे. कोणी कांहीं ह्मणेल, कोणी कांहीं ह्मणेल. त्यांत कांहीं अर्थ नाहीं, कारण आपण आहों ज्ञानी. "सुखदुःखे समाचरेत्" या न्यायानें हजार रुपयांच्या तेजीवर बसून फिरणें, किंवा लंगड्या गाढवावर स्वार होणें सारखेंच! तसेंच, आपल्या धन्याचा अपजय आणि त्याच्या शत्रूचा जय हीं दोन्ही सारखींच! स्वराज्य बुडालें काय आणि यावत्सर्व यवनमय झालें काय सारखेंच! सारांश आपल्यासारख्या ज्ञात्यास हे सगळे प्रकार सारखे समजणेंच योग्य. ज्ञानांतीं मोक्ष आहे ह्मणतात, तर हें लचांड मात्र मागें लागेल. कारण, तो जीवन्मुक्त करणारा, ह्मणजे पुनरपि जन्म न देणारा असा मोक्ष बुवा आपल्यास कांहीं नको! पुन्हा जन्म नाहीं तर ऐहिक सुख तरी कोठून मिळणार? तेव्हां याला तोड? (जरा विचार करून) ठीक, सुचलें. शहाण्याची बला दूर! या अशा मोक्षापेक्षां, चार्वाक् मीमांसेनें जो मोक्ष स्थापित झाला आहे, त्याचीच इच्छा आपण करावी; ह्मणजे जन्मोजन्मीं देखील आपल्यास यथेच्छ सुखप्राप्ति होईल! चलो, अब जाय. जय परमेश्वर! अरे, अरे! छे! छे! कोण अमंगळ शब्दांचा उच्चार तरी हा! आतां आपण आहों कोण? आहों कोठें? याचा कांहीं तरी विचार! सुबहानल्ला! सुबहानल्ला! (असें ह्मणत ह्मणत निघून जातो.)

## अंक पांचवा समाप्त.

---

# अंक सहावा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—श्रीरंगपट्टण एथील बैराग्याचा मठ.

( चंपा व साळू प्रवेश करितात. )

**चंपा**—साळू, मोठ्या साहसानं आपण या श्रीरंगपट्टणास येऊन पोहोंचलों. पण काय ग, आपल्या माणसांची काय वाट झाली, याचा शोध कसा बरं लागावा ?

**साळू**—सोध लावापाई कांहीं तरी इगत काढाया होवी, ताईसाब.

**चंपा**—( विचार करून ) मला तर बाई, कांहीं सुचत नाहीं. काय युक्ति करावी तें तूंच सांग.

( इतक्यांत रस्त्यांत दौंडी पुकारते. )

'सरकारकी तरफसे इजहार किया जाता है के, आज शामको नदीकिनारेपर हिंदुओंके मशानमे बाजे नरगुंदवाले दुशमनोंको मौतकी सजा देनेकी है. ओ देखनेके लिये जिसका जी चाहे ओ आवे.'

**चंपा**—( दौंडी ऐकून ) काय ग साळू, दौंडी काय ग पिटताहेत ही ?

**साळू**—व्हय जी, ही दवंडीच हाय.

**चंपा**—कशाची ग दवंडी ही, नीट ऐकलंस का तूं ?

**साळू**—नीट नाहीं ऐकलं जी, पन् नरगुंद इक्तं मातूर—

( इतक्यांत पुनः पूर्ववत् दौंडी पुकारते. )

**चंपा**—अग गप्प, ऐकूं दे नीट. ( ऐकून ) साळू,

आतां तरी ऐकलंस ना ? ( खिन्न मुद्रेनें ) ज्याला भीत होतें तेंच कीं ग पुढं आलं ! हे खाटिक धरून आणलेल्या आमच्या सगळ्याच माणसांना मारणार काय ? याची बाई मला कांहींच कल्पना होईना ! देवा, आतां करूं तरी काय ? हेंच ऐकायला मी एथपर्यंत धांवून आलें का ? जिथं जाइन तिथं हें दैव कसं माझ्या हात धुवून पाठीस लागलं आहे ! नकोरे दैवा आतां छळूं ! ! ( रडूं लागते. )

**साळू**—ताईसाब, रडूं नका. आपुन कोन हाव ते लोक वळखतील. अहो खास मंडळी यांत नसावी, बरोबरचीं दुसरीं माणसं असतिला. हे बगा मी आतां त्या मठांतल्या ह्मातारीबराबर गांवामंदी हिंडून सोद आनतें. तिथवर तुह्मी हतच आंत खोलीमंदीं बसा.

**चंपा**—बरं तर, शोध घेऊन ये. मग आपण असं करूं.

**साळू**—काय करायचं, ताईसाब ?

**चंपा**—हें बघ आज तूं संध्याकाळीं त्या चांडाळांनीं मारण्याची जी जागा नेमली आहे तिथं जाऊन, तुला चांगलं दृष्टीस पडेल आणि आपलीं माणसं स्पष्ट ओळखतां येतील अशा ठिकाणीं जाऊन उभी राहा आणि तेथें कसकसा प्रकार घडेल तो डोळ्यांनीं पाहून मला येऊन सांग. ( मनांत ) दौंडीवरून यजमानाशिवाय बाकीचीं सगळीं माणसं मरणार. ( उघड ) त्या माणसांत जर माझ्या प्राणपतीचाही शेवट झालाच तर, मग तूं आणि मी आज मध्यरात्रीस त्या स्मशान भूमींत जाऊं; आणि तिथं गेल्यावर परमेश्वर आपल्याला जशी बुद्धि देईल तसं करूं, समजलीस का ?

**साळू**—व्हय जी. आदुगर गांवांतला सोध आनतें, आन् सांच्यापारीं तिकड काय परकार होतो तो बगून शानी सांगतें. कपाळीं आलया खरं त्यो मरवडा बगायचा ! ( रडूं लागते. )

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—श्रीरंगपट्टण एथील कावेरी नदीच्या कांठची स्मशानभूमि.

( चंपा व साळू पुरुषाचे पोषाखानें प्रवेश करितात. )

**चंपा**—( हलक्या शब्दानें ) हीच का ग ती जागा साळू ?

**साळू**—व्हय जी, हीच ती मसनवट, ताईसाब. जरा म्होरं चला आन् बगा कीं काय काय पडलं हाय तें.

**चंपा**—( पुढें जाऊन दचकून मागें येते. ) होय ग बाई ! हींच मारलेल्या माणसांचीं मढीं बरं ! अग, तूं नीट पाहिलं आहेस ना त्यांना सुद्धां इतरांबरोबर आणून मारलेलं ?

**साळू**—व्हय जी, किल्ल्यांतून समदीं माणसं बाहेर काढलीं, तवां मैदानांत जमलेल्या तमासगिरांमंदीं मीबी उभी होतेंच. राणबा तोडकरांसनी अन् अमृतरावांसनी एकूच पिचांडीला बांधून आणलं अन् तसंच बगा समद्या संबर लोकांबराबर त्यांनाबी धरून नेलंच. मीबी तमासगिरांमंदीं शिरून मागोमाग चालूं लागलें. अन् हत आनूनशानी, अमृतराव अन् आपल दुसर तिसर मानकरी शिपाई समद्यांसनी बसवून त्यांच्यावर बंदुका उडिवल्या. मग काय इचारता, ताईसाब, गोळ्या घालल्याबराबर पटापट पाकरांवानी किव समदीं मानसं

पडलीं ! ताईसाब, नका आतां या टवळीच्या तोंडानं जास्ती वदवूं ! (रडते.)

**चंपा**—चुप राहा. (वर आकाशाकडे पाहून हळूच) पाहा, हें नक्षत्र डोईवर आलं आहे. मध्य रात्र उलटली असावी. नदीच्या प्रवाहांतील पाण्याच्या खळखळ शब्दाशिवाय सर्व कसं सामसूम झालं आहे. अग, मनुष्य किनइ जिवावर उदार झालं ह्मणजे त्याला घर आणि हें भयंकर स्मशान हीं सारखींच नाहीं, बरं साळू ?

**साळू**—त्ये तर खरंच. पण आतां तुह्मी इथ करनार काय ?

**चंपा**—काय करायचं तें तुझ्या देखतांच करतें. अग, मला वाटतं त्या दुष्ट चांडाळ सैय्यद बुऱ्हानुद्दिनाच्या लिहिण्यावरून माझ्या प्राणपतीचा तर नाश होऊन चुकला आहे ! चिंता नाहीं ! (डोळे पुशीत) स्वामिकार्यावर हलाल झाले ! (निराश होत्साती जिवावर उदार होऊन) पण आतां, ही वीरकन्या आणि वीरपत्नी दुसऱ्याच्या हातीं लागणार आहे काय ? छिः ! तसं कालत्रयीं घडणार नाहीं. हा माझा दृढ निश्चय परमेश्वरानंच पार पाडावा. पाहा, त्या दुर्घट कारागृहांतून सुटून श्वानरूपी यवनांच्या तडाक्यांतून मी मुक्त झालें, व ज्या ठिकाणीं माझ्या प्राणवल्लभाचा देह स्वामिकार्यांत अश्रांत श्रम करून अक्षय निद्रेचें सुख भोगीत आहे त्या ठिकाणीं मोठ्या प्रयासानें प्राप्त झालें आहें. तेव्हां आतां शेवट साजरा करून या मृत्यु लोकचा प्रवास लवकर आटपावा हेंच उत्तम ! हें स्थळ या समयीं माझ्या नेहमींच्या वास्तव्यस्थानापेक्षां आणि त्यांतील सुखोपभोगाच्या वस्तूंपेक्षां देखील माझ्या मनांस जास्त समाधान करीत आहे.

(आकाशाकडे पाहून) ह्या चमकणाऱ्या चांदण्या ह्या माझ्या महालांतील बिलोरी हंड्या होत. (पलीकडे जळत असलेलीं मढीं पाहून) हीं जळत असलेलीं सरणें प्रज्वलित केलेल्या समया होत; आणि ही जी आपली वीर मंडळी मारून टाकली आहे ही देवडीवरील पाहऱ्याचीं माणसें होत. आणि (नदीकडे पाहून) हें आकाशप्रतिबिंबित कावेरी नदीचें पात्र निळ्या मखमलीचे गादीवर पांढरी चादर पसरून तयार केलेला बिछाना होय. तर समयीं देवदयेनेंच प्राप्त झालेल्या या बिछान्यावर माझ्या प्राणप्रियाचे प्रेतास दृढ आलिंगन देऊन मला लवकर अक्षय सुखाचा लाभ घेऊं दे! ह्मणजे ज्या अमृतरायाचा हात या जगांत आपला प्राणपति ह्मणून ममतेनें मीं धरिला त्या पतिराजाची शेवटची पतिसेवा आटपली!

**साळू**—माझी बाई जशी लगीनकार्यामंदीं नवऱ्याचं नांव घेती जनू? (स्फुंदत चंपाच्या गळ्यास मिठी मारते.)

**चंपा**—(साळूस झिडकारून) अग, हें सहगमनाचें मंगलकार्यच आहे. तोंड मीट, हळू बोल. चल, प्राणवल्लभाचं प्रेत शोधून काढूं; मजसाठीं प्राणप्रियाचा आत्मा तिष्ठत उभा असेल!

**साळू**—आपुन गेल्यावर मला तरी दोडाला जगून काय करायचं हाय? मीबी तुमासंगच येतें!

**चंपा**—(हळूच) चल तर, प्रेताचा शोध करूं. (चंपा व साळू प्रेतावरील कपडे गोळा करून जवळ जळत असलेल्या सरणावर पेटवून मुडद्यांत हिंडून पाहूं लागतात.)

**प्रेतसमुदायांत पडलेला अमृतराव**—(मनांत) नशीबाची गति विलक्षण आहे! देव जिथं तारणारा आहे

तिथं कोण मारणार? आज हीं शें दीडशें माणसें गोळी घालून ठार केलीं, त्यांत मजवर नेम धरलेल्या बंदुकीची गोळी चुकावी आणि मीं जगावें, हें आश्चर्य नव्हे काय? सारांश ईश्वरकरणी अगाध आहे! असो, आतां या भयंकर स्मशानांत आणि या प्रेतसमुदायांत अद्याप किती वेळ पडून राहवें बरें! पण काय करूं? गांवांतून एका मागून एक तीन चार मढीं दहनाकरितां आलीं त्यामुळें मला इतका वेळ इथें पडून राहवें लागलें. बरें तीं आलेलीं माणसें आणलेल्या प्रेतांच्या चितेस अग्नि पेटवून एका मागून एक निघून गेलीं. असें असून आतां ही माणसांची चाहूल, आणि भाषणाची गुणगुण कसली ऐकूं येत आहे? (जरा डोकें उचलून पाहतो इतक्यांत साळू व चंपा प्रेतांचे चेहरे पाहत हिंडत होत्या तें पाहून) अरे बाप! हें काय? स्वस्थ पडून राहवें.

**चंपा**—(हळूच) साळू, पाहा ही आपली मानकरी मंडळी! यांनीं आपल्या धन्याकरितां प्राण दिला ना? धन्य यांची! देव यांस सद्गति देवो!

**साळू**—हें बगितलत का? कुनीं तोंडच वासलया; कुनीं दातूच विचकल्यातीं; कुनीं डोळच पसरल्यात, कुनीं झाकल्यात; कुनाच कोथळच बाहेर पडल हैत; कुनाचीं डोकीं फुटून तुकड झाल्यातीं; कुनी उलथ, कुनी पालथ पडल्याती! तो सुखाचा परान जावा तरी कसा? जीव जातांना काय काय झाल असल र देवा! देवा!!

**चंपा**—पण अग, त्यांचा चेहेरा अजून कां बरं दृष्टीस पडेना?

**साळू**—(हळूच) मीं पुरतं हेरलया बगा, समद्यांच्या शेवटीं नदीकडल्या बाजूस त्यांसनीबी बसीवलं

होतं. हंग असच या. हीं समदीं वलांडून पल्याड जाऊं
(जरा पुढें जाऊन पाहतात.)

**अमृतराव**—(पडल्या जागीं मनांत) काय हा चमत्कार!
ही कोणाची चळवळ असावी? ही गुणगुण मनुष्याचीच
असेल काय? (जरा डोकें वर करून) अरे! हे मरून पड-
लेल्या प्रेतांमधून हिंडत आहेत! दोन माणसांच्या आ-
कृति दिसत आहेत. हीं खरींच माणसें असतील काय?
हीं कां बरें इथें फिरत असावीं? माणसें जर ह्मणावीं,
तर ही अपरात्रीची वेळ, ही भयंकर स्मशानभूमि, पली-
कडे प्रेतें जळताहेत, तशांत नुकतींच मारून टाकिलेल्या
माणसांचीं पडलेलीं अस्ताव्यस्त प्रेतें; शिवाय कानांस क-
र्कश व मनास उदास वाटणारें घुबडाचें घुमणें, टिटवीचें
टिवटिवणें, कोल्ह्याची कुई, शेजारच्या झुडपांतील कि-
ड्यांची किरकिर, असे हे अमंगळ ध्वनि आणि प्रेतधू-
म्राची दुर्गंधी असा हा दुर्लक्षण भयंकर देखावा सहन
करून, या वद्यपक्षांतील चतुर्दशीच्या काळोखांत येथें
येणारे हे धारिष्टवान् कोण असतील बरें? बरें! या प्रेतांचे
आंगावर पैसा अडका चांगलीं वस्त्रें असतील या समजुतीनें
आलेले हे द्रव्याभिलाषी चोर तर नसतील ना? किंवा स्मशा-
नांत संचार करणारीं हीं भुतें कशावरून नसतील? अथवा
हे मनुष्यभक्षक राक्षस तर नसतील? किंवा गिधाड, कोल्हीं,
कुत्रीं यांकडून प्रेताची अनास्था न व्हावी या हेतूनें रातोरात
प्रेतसंस्कार करून टाकावा ह्मणून प्रेतांचे आप्तजन तर आले
नसतील ना? छेः! हें तर स्वप्नींसुद्धां होणार नाहीं, कारण
नरगुंदाहून इतक्या लांब पल्ल्यावर अशा बिकट प्रसंगीं
येणार कोण? ही कल्पना व्यर्थ आहे! (जरा विचार करून

मनांत ) बरें, गोळ्या घालून मारलेल्या माणसांपैकीं माझ्यासारखा एखादा अकस्मात् बचावून रात्रीं पळून जाईल ही शंका येऊन शत्रूंनीं तपास करण्याकरितां मुद्दाम तपासणीदार तर पाठविले नसतील ना? कोणी जरी असलें तथापि मी जीवंत राहिलों हें दुसऱ्यास समजणें मला अनिष्टकारकच होय. आतां हे अगदीं जवळ आले! गारठ्यानें सर्व शरीर केळीच्या कालासारखें गार झालें आहे, तरी पाहा, सर्वांगाला कसा घाम सुटूं लागला आहे! आतां भिऊन उपयोग काय? श्वास बंद करून डोळे मिटून स्तब्ध पडावें! ( पडतो. )

**साळू**—( अमृतरावाचा चेहरा ओळखून ) व्हय हेच. ( चंपास लक्षून ) धरा, अडचणींतून जरा बाजूला काढूं.

( दोघींनीं दंडांस व डोक्यास धरल्यासरशीं दोघींस ढकलून अमृतराव पळूं लागतो. चंपा व साळू त्याच्यामागें धांवतात व कांहीं अंतरावर त्यास धरतात. अमृतराव आवेशानें दोघींस लाथाबुक्या मारून खालीं पाडतो. त्याचा शेला चंपाचे हातीं राहतो. )

**अमृतराव**—( संतापून ) नीचांनों, जिथें परमेश्वर तारणार तिथें तुह्मी कोण मारणार? ( आपल्याशींच ) आतां या आसमंतांतील भागांत राहून उपयोग नाहीं. लवकर एथून पळ काढिला पाहिजे. बरें, मी किती लांब आलों? आहें कुठें? दिशासुद्धां समजेना! अरे, हीं कुत्रीं भोंकताहेत, शहराजवळ तर आलों नसेन? होय! हा कोट, ही वेस, खरोखर शहराजवळच आलों. परंतु या प्रसंगीं हा गांवचा देखावा त्या स्मशानापेक्षां देखील मला अत्यंत भीतिप्रद झाला आहे, तर आतां एथें उभें राहून उपयोग नाहीं.

मुकाट्यानें चालतें व्हावें. पण जावें कुणीकडून ? कारण, हें श्रीरंगपट्टण कावेरीनदीनें वेष्टिलें आहे. नदींतून पार व्हावें तर हा भाद्रपदाचा महिना, नदी दुथडी भरून चालली आहे. जरी मला पोहतां येत आहे तरी, पाण्यांत भिजून कांकडत जाण्यापेक्षां—( चोहोंकडे निरखून पाहून )—होय, मी आतां गांवचे दक्षिणेस आहें तेव्हां असेंच म्हैसूररस्त्यानें पुलावरून चालतें व्हावें हें बरें. छेः ! पण नको तो राजमार्ग. किरंगूर पुलावरून बलारीमार्गानें जाणें बिनधोक होईल. तर तिकडूनच जावें. ( जातो. )

---

## प्रवेश तिसरा.

**स्थल**—श्रीरंगपट्टण एथील म्हैसूरदरवाजाबाहेरील मैदान.

( एक गृहस्थ आपल्या नौकरासहित प्रवेश करितो. )

**गृहस्थ**—वाः ! हा पंचपंचउषःकाल मनास किती बरें आनंद देत आहे ! अशा वेळीं पायानें चालणें मोठें सुखकारक वाटतें. कायरे विठ्या, डोलीबिली सर्व खटलें जवळ आलें ना ?

**विठ्या**—व्हय जी, मागोमागच आलंया.

**गृहस्थ**—शिव धन्य काशी ! काशीविश्वेश्वर ! हरे राम ! हरे राम ! ( याप्रमाणें देवाचें नांव घेत चालूं लागतो, इतक्यांत चपापून ) अरे, हें कोण रे रस्त्यावर पडलें आहे ?

**विठ्या**—दोन मानसं पडलेलीं दिसत्याती, साहेब.

**गृहस्थ**—अरे, तीं कण्हत आहेत.

**विठ्या**—व्हय जी, खरंच तीं कन्हत्याती.

**गृहस्थ**—पाहूं बरें, ( जरा जवळ जाऊन दोघे वांकून पाहतात. ) हीं कोण व इथें कां पडलीं असावीं बरें ?

**विठ्या**—काय जणु, साहेब.

**गृहस्थ**—मला वाटतें, काल आपण संध्याकाळीं या पश्चिमवाहिनी कावेरी तीर्थाजवळ धर्मशाळेंत जेव्हां येऊन उतरलों, तेव्हां, नरगुंदकरांचीं माणसें टिपू ठार मारणार ह्मणून, तें पाहण्याकरितां या मैदानांतून लोकांचे थव्यांचे थवे चालले होते. त्या मारलेल्या माणसांपैकीं हीं दोन्ही अवचित वांचून, मारलेल्या जागेपासून हलकेंच रेंगत एथें येऊन पडलीं तर नसतील ?

**विठ्या**—असत्याल महाराज.

**गृहस्थ**—( नीट न्याहाळून पाहून ) अरे, या बायका दिसतात, विठ्या.

**विठ्या**—व्हय जी, मातूर वेस पुरुसाचा हाय.

**गृहस्थ**—अरे, त्यांच्या डोकीचा पटका आणि आंगरखा जरा बाजूस कर पाहूं. ( विठ्या तसें करितो. ) खरंच बायका आहेत ! आणि ह्या ब्राह्मण, मराठे अशा चांगल्या जातींपैकीं असाव्या असें यांच्या चिन्हांवरून दिसतें.

**विठ्या**—व्हय जी, गळ्यामंदी मंगळसूतर हाय, हातांत बांगड्या हैता, अक्षी बामनह्मराट्यांवानीच दिसत्याती.

**गृहस्थ**—ह्या कशानें बेशुद्ध झाल्या असाव्या बरें? अरेरे !! नाकातोंडांतून रक्त वाहत आहे. कानशिलांवर, डोकीला, व कपाळावर मार बसलेला दिसतो ! काय रे? अगदीं तरुण दिसतात ! या बिचाऱ्यांवर कसलें संकट पडलें असावें ?

**विठ्या**—त्यांचं त्यांनाच ठाऊक काय आसल तें.

**गृहस्थ**—परमेश्वरा, या मुसलमानी राज्यांत आपल्या हिंदूंचा कशापरी छळ होईल याचा नेम नाहीं ! या अ-

बलांचा जीव वांचविणें हें आपण यात्रा तीर्थें करीत हिंडत आहों त्यांपैकींच एक सत्कृत्य समजलें पाहिजे. अद्याप थोडासा काळोख आहे, माणसें अद्याप हिंडूं फिरूं लागलीं नाहींत, इतक्यांत, आपल्या डोलींतून यांस मुकाट्यानें घेऊन चालतें व्हावें. डोली थांबवा रे. धर विठ्या, उचला लवकर !

( चंपास व साळूस डोलींत घालून नेतात. )

---

## प्रवेश चवथा.

### स्थळ—पुणें शहर.

( अमृतराव फकीराचे वेषानें प्रवेश करतो. )

**अमृतराव**—( आपल्याशींच ) आपण या हिंदुपद बादशाहाचे राजधानीस तर येऊन पोहोंचलों. परंतु पाहा, एथें येण्यास बरोबर आज दहा महिने लागले. वाटेंत कोण हरकती आणि अडचणी ! कर्नाटकांत टिपूच्या लष्करानें तर निवळ हैदोस मांडला आहे ! धर हिंदु कीं कर सुंता ! दोन हजार ब्राह्मणांनीं बाटविले जाण्याच्या भीतीनें नद्यांत जीव सुद्धां दिले ! कोण भयंकर ब्रह्महत्या ही ! या दुष्कर्माचें फळ ते चांडाळ भोगल्यावांचून राहतील काय ? ते गुलाम भोगतील तेव्हां भोगोत ! परंतु, तूर्त भोगण्याची पाळी आह्मां हिंदूंवर आली आहे हें खरें ! मी जर असा दरवेशी बनलों नसतों, तर सुंता करून घेण्याची पाळी खरोखर मजवर आली असती ! किल्ले कोट सर करीत टिपूचें लष्कर बदामीपर्यंत येऊन धडकलें. असा धुडावा पेशव्यांच्या राज्यांत टिपूनें मांडला असूनही, कानांवर हात ठेवून बसलेल्या नाना फडणिसाची कानउघाडणी या

फकिराचे वेषानें केली पाहिजे. जेणेंकरून नानास दाद लागेल अशा तऱ्हेचा सवाल करीत शहरांत फिरून त्याची गांठ घेतोंच.

( अमृतराव जातो. )

---

## प्रवेश पांचवा.

**स्थळ**—नाना फडणीसाचा वाडा.

( नाना फडणीस रात्रौ एकांतीं कागदपत्र पाहत बसले आहेत. )

**नाना फडणीस**—(आपल्याशींच) एक एक कागद काढून पाहत जावा, तसतसे जास्तच चमत्कार दृष्टीस पडत चालले आहेत. माझें लक्ष एकीकडे गुंतवून आपला मतलब साधण्याचा हे घाट घालूं पाहत आहेत काय? ठीक, ठीक, याच गुंगींत त्यांना बसूं द्या! हें राज्यकारण पुरतें आपल्या छापेंत येईपर्यंत त्यांचा मतलब माझ्या लक्षांत आला हें त्यांस मी मुळींच समजूं देणार नाहीं. पुढें त्यांचीं बोटें त्यांच्याच डोळ्यांत जातील अशी युक्ति परभारेंच करून टाकीन, ह्मणजे आपोआप फिके पडून जागच्या जागीं ते स्वस्थ बसतील. हें असूं द्या, परंतु, तूर्त टिपूचे पुंडाव्याकडे मला पाहिलें पाहिजे. वारंवार रास्त्यांकडून टिपूच्या उन्मत्तपणाबद्दल लिहून येत आहे. (इतक्यांत घाशीराम कोतवाल आल्याची वर्दी हुजऱ्या देतो.) काय, कोतवाल आले? येऊं द्या. (घाशीराम मुजरा करून उभा राहतो.) बसा कोतवाल, काय खबर आहे?

**घाशीराम**—आज्ञेप्रमाणें, निजामअल्लीकडून एथील त्यांच्या वकिलास पत्रें घेऊन जासूद जोड्या आलेल्या

पकडून त्यांजकडील हीं पत्रें आणिलीं आहेत. (पुडकें पुढें करतो.)

**नाना फडणीस**—(कागदपत्र उलटसुलट वाचूनपाहून) बरें, हीं जशींचीं तशीं बेमालूम जासुदांकडे परत द्यावीं, आणि त्यांचे वकिलाकडे पावती करण्यास सांगावें. पत्रें घेऊन परत दिलीं ही बातमी न फुटण्याचा बंदोबस्त चालीप्रमाणें तुह्मीं केलाच असेल.

**घाशीराम**—ते नेहमीं वहिवाटलेले जासूद आहेत. ठरल्याप्रमाणें ते वागणार यांत शंका नाहीं.

**नाना फडणीस**—या खेपेस जरा विशेष लक्ष दिलें पाहिजे.

**घाशीराम**—त्याबद्दल कांहीं काळजी नको. या घाशीरामाशीं गांठ आहे, हें ते लोक पक्कें जाणत असून फायदा सोडून मुद्दाम ते अडचणींत कां पडतील ?

**नाना फडणीस**—आणखी कांहीं कमजास्त ?

**घाशीराम**—बेटावरील बातमी काल चिठ्ठीनें कळविलीच आहे.

**नाना फडणीस**—गांवांतील नवलविशेष कांहीं नाहीं ना ?

**घाशीराम**—किरकोळ मजकूर आहेत. विशेष ह्मणण्यासारखे नाहींत; परंतु, कालपासून शहरांत एक फकीर आला आहे. तो दिवसा फिरत नाहीं. मध्यरात्रीच्या सुमारास विशेषेंकरून बुधवार व शनिवार या दोन पेठांतून "हिंदूका वाली कोइ है?" असा सवाल करीत फिरत असतो. खैरात घेत नाहीं. देऊं गेलें असतां "देनेवाला धनी दिया तो लेउंगा" इतकें ह्मणून पुढें चा-

लता होतो, आणि बहुतकरून आपल्या वाड्याशेजारीं जास्त घिरट्या घालीत असतो.

**नाना फडणीस**—काल रात्रीं मीं देखील त्या फकिराचा सवाल ऐकिला. आज तुह्मी असें करा–(इतकें बोलून विचार करीत बसतो.)

**घाशीराम**—जी ?

**नाना फडणीस**—आज मी त्या फकिराची वाट पाहत या खिडकीच्या शेजारीं बसतों. तुह्मी तो फकीर आमच्या वाड्याजवळ येण्याबरोबर त्याला ही खिडकी दाखवून तुझा सवाल त्या खिडकींतून ऐकणारे ऐकतील इतकेंच सांगा. मात्र त्याच्या कंबरेस पेषकबज वगैरे हत्यार आहे किंवा कसें याची बिनाखी करून घेऊन त्याचा इषारा, आह्मी फकिरास वर बोलावण्याचे आंत आह्मांस द्या. समजलांत ?

**घाशीराम**—जी होय. असा हत्यारी फकीर शहरांत मी कसा हिंडूं देईन ? आज्ञेप्रमाणें पुन्हा पाहतों.

**नाना फडणीस**—बरें, जा तर आतां.

**घाशीराम**—जी हुकूम. (असें म्हणून तो निघून जातो.)

**नाना फडणीस**—(आपल्याशींच) कोण मनुष्य कशा बहाणीनें या पुण्यांत येईल याचा नेम नाहीं. इंग्रज बकध्यान करीत बसलाच आहे. फिरंगी, फरासीस, हातांत हात घालून सल्लामसलत देण्याचा आव घालीत आहेत. हिंदूंचे हाडवैरी मुसलमान जरा दाबले कीं मेंढीप्रमाणें मुंडी खालीं घालून बसतात आणि जरा कानाडोळा झाला कीं लगेंच डाफरून येतात ! तेव्हां त्या सगळ्यांचा समाचार प्रसंग पाहून घेणें भाग आहे. हा

फकीर कोण आणि "हिंदूका वाली कोइ है?" ह्या त्याच्या सवालांतील मतलब काय असावा बरें? टिपूनें, आमच्या राज्यांतील किल्ले, कोट, प्रांत घेतले; हजारों हिंदूंस बाटविलें; हिंदूंचा वाली कोणी राहिला नाहीं; या घमेंडीनें ही डाफरणीची द्वाही माझ्या कानावर घालण्याकरितां मुद्दाम टिपूनें हा फकीर पाठविला असेल काय? अथवा, त्यानें असा जुलूम हिंदूंवर चालविला असूनही, हिंदूंचा त्राता कोणी राहिला नाहीं हें मला समजावें या उद्देशानें आपल्या प्रजेपैकीं कोणी आला तर नसेल? या दोहोंपैकीं एक असलें पाहिजे; याचा निकाल काय तो क्षणभरानें आपोआप होईलच.

( इतक्यांत, 'हिंदूका वाली कोई है?' असा सवाल रस्त्यांत होतो.)

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—(इषाऱ्याप्रमाणें खिडकीखालीं उभा राहून) हिंदूका वाली कोई है? ( असें चार पांच वेळां मोठ्यानें पुकारतो.)

**नाना फडणीस**—( वरून ) है.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—( मनांत ) खिडकी दाखविलेला इषारा आणि माझ्या सवालास तात्काळ उत्तर, यावरून पाहतां बहुतकरून या खिडकींत खुद्द नाना फडणीसच बसले असावे. कांहीं असो. आपण आपले पुढील सवाल बोलून जावें, ह्मणजे कोण आहे तें इतक्यांत कळून येईल.

( अमृतराव सवाल बोलतो. )

"राग जोगी" साकीच्या चालीवर.

टिपू बहादर चलके आया खडा छातिपर तेरे ।
हिंदु धर्मकुंभि डुबा दिया उस्ने, बने मुसलमिन् सारे ॥

अकल गइ तेरी । करके हालत ये सारी ॥ ध्रु० ॥
आ हद् तुंगा ता हद् घटपा, बीच मुलुक आबाद ।
लूट लाटके खाक उडाया, और किया बरबाद ॥ अ०ग०॥१॥
झेंडा फडकत छत्रपतीका, गडकिलोंपर बुलंद[1] ।
वैसे किले हमला करके, बना टिपू खावंद ॥ अकल ग०॥२॥
उन् किलोंमे महामत गडने, मारा टक्कर पक्की ।
भेज दी फौज फिरालिये जब, है नामर्दी किस्की? ॥
बोलोजी नाना, दुनया कहती तूं दाना ॥ ३ ॥

**नाना फडणीस**—वाहवा, वेळेवर कोर्डा !

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—जिसको हिंदूपद बादशाहाका वजीर नाना फडणीस कहते है, ओही है?

**नाना फडणीस**—त्या गादीचा सेवक तुह्मी ह्मणतां तोच मी आहें.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—मेरा सवाल तेरेसेही पूरा होगा, ये जान कर, मै यहां आया हूं.

**नाना फडणीस**—ठीक. आपण आतां वर यावें.

(हुजरे अमृतरावास वर नेतात.)

**नाना फडणीस**—(त्याला पाहून) शाबास! शाबास! असे निस्पृहपणानें दोष देणारे विरळा. आपण बसावें.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—मेरे तन्[2] बदनमे आग सिलग[3] रही है. उसका शोला[4] बाहेर निकल आना कुदरतीधरती है, आप दाना हो जानते हो.

**नाना फडणीस**—सत्य आहे. बसावें आतां.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—अब मै

---

१ बुलंद=उंच. २ तन् बदनमे=शरीरांत. ३ सिलग=पेट; सिलग रही है=पेटली आहे. ४ शोला=झाळ किंवा ज्वाला.

जो खैरात आपसे मंगता हूं सो देओगे ऐसा कौल आ-
पसे लियेबाद बैठुं गा.

**नाना फडणीस**—काय मागणें आहे?

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—जो मेरे धनी और नरगुंद संस्थानके मालक वेंकटरावसाहेब भावे सचीव, दुष्मन् टिपूके यहां हाल गिरफ्तार होके रहें हैं, उनको छुडाकर लाना; और दुष्मन् टिपूने जिस् तौरका जुलुम हमारे मुलुखपर कियाहै उस् तौरकी सजा उसको जरूर देना चहिये.

**नाना फडणीस**—आपल्या ह्मणण्याप्रमाणें खचीत होईल; आपण बसावें. (अमृतराव बसतो.) आपण फकीर नव्हे हें उघड आहे. तर संस्थानिकांचे पदरीं आपण कोण आहां, आपलें घराणें कोण, नांव काय, हें सर्व ऐकण्याची आमची फार उत्सुकता आहे.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—नरगुंद संस्थानांतील रणसिंग घराणें सरकारास ऐकून ठाऊकच असेल?

**नाना फडणीस**—होय, नरगुंद किल्ल्याचे किल्लेदार व संस्थानचे मानकऱ्यांतील प्रसिद्ध रणसिंग घराणें हीं ठाऊक आहेत.

**फकिराचा वेष घेतलेला अमृतराव**—त्या घराण्यांतील हा आपला सेवक अमृतराव आहे, सरकार.

**नाना फडणीस**—अमृतराव, हा फकिराचा वेष धारण करण्याचें कारण काय?

**अमृतराव**—हिंदु धर्माचा छळ टिपूनें त्या प्रांतीं कसा मांडिला आहे, आणि त्यामुळें हिंदूंस आह्मी हिंदु आहों असें उघड ह्मणणें हल्लीं तिकडे किती भीतिप्रद झालें

आहे, याचें खरें स्वरूप आपल्यास दाखवावें; शिवाय, संस्थान बुडालें, धन्यास नेलें, तेव्हां अर्थात् फकीर बनलोंच आहें; ह्मणून हाच वेष योग्य जाणून या वेषानें आपल्या चरणांपाशीं आलों आहें.

**नाना फडणीस**—( हुजऱ्याकडून पोषाख आणवून ) बरें, आपण या अमंगळ वेषाचा त्याग करून आतां हा पोषाख घालावा. ( अमृतराव पोषाख घालून नानास मुजरा करून बसतो.) अमृतराव, राज्यकारणीं कामांत प्रसंगीं पड आणि वेळेस वरचड करावी लागते, तसें नरगुंदकरांचे मदतीस पाठविलेली फौज प्रसंगास अनुलक्षून माघारी घेणें प्राप्त झालें; आणि त्यामुळें संस्थानिकांचा नाश होऊन टिपूच्या अतिक्रमणानें आमच्या राज्यांतील बखेडा, प्रजेचा झालेला छळ, आह्मांसही दुःसह झाला आहे. आतां त्याचे निरसनार्थ त्या टिपूचें पारिपत्य त्याच थाटानें झाल्यावांचून राहील असें तुह्मी समजूं नका.

**अमृतराव**—मग तें कधीं होणार, महाराज?

**नाना फडणीस**—या पूर्वींच रास्त्यांकडून आह्मांस सर्व मजकूर कळला आहे, तेव्हांपासून आह्मी त्याच तयारींत आहों.

**अमृतराव**—आणखी थोडीशी विनंति आहे, महाराज.

**नाना फडणीस**—ती काय, अमृतराव?

**अमृतराव**—आजपर्यंत धरून नेलेल्या माणसांपैकीं जीं मेलीं तीं गेलींच, परंतु जीवंत राहिल्यांपैकीं आमचे धनी व्यंकटरावसाहेब व बरोबरची नौकरचाकर अशी बेचाळीस मंडळी जी कैदेंत आहे त्यांचे जिवास त्यांची सुटका होईतोंपर्यंत धक्का न लागेल असा बंदोबस्त व्हावा.

**नाना फडणीस**—ठीक आहे, याविषयीं अगत्य बंदोबस्त होईल. अमृतराव, टिपूनें नरगुंदकरांचीं माणसें मारिलीं काय ?

**अमृतराव**—पुष्कळ माणसें दावणीच्या दावणी गोळ्या घालून मारिलीं, महाराज ! मी ही त्याच संकटांत पडलों होतों; परंतु यजमानांच्या पुण्याईनें हे पाय मोठ्या प्रयासानें दृष्टीस पडले. (आपली सर्व हकीगत सांगतो.)

**नाना फडणीस**—अमृतराव, तुमच्यावर गुदरलेलीं संकटें ऐकून आह्मांस फारच वाईट वाटत आहे. हें पाहा, दुःखामागें सुख आहेच; तुमचे धनी तुह्मांस मिळतील, त्यांचें संस्थान त्यांस मिळेल, काळजी करूं नका.

**अमृतराव**—महाराज, आलेली कामगिरी बजाविली, आतां निरोप व्हावा.

**नाना फडणीस**—अद्याप तुह्मीं आपलें स्वामिकार्य पुरतें बजाविलें नाहीं.

**अमृतराव**—काय आज्ञा आहे ?

**नाना फडणीस**—इकडून लवकरच टिपूचे पारिपत्यास्तव हरिपंत फडके व परशरामभाऊ पटवर्धन यांजबरोबर सैन्य रवाना होणार आहे. कदाचित् आह्मी देखील खुद्द जाऊं; तर तुह्मी लष्कराबरोबर राहून टिपूस जिंकून, आपल्या धन्यास परत आणा. तेथपर्यंत स्वस्थ आमच्याजवळ राहावें.

**अमृतराव**—आज्ञा, महाराज.

(सर्व जातात.)

**अंक सहावा समाप्त.**

# अंक सातवा.

---

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—बदामीनजीक पेशव्यांच्या फौजेचा तळ.

(नाना फडणीस, हरिपंत फडके, परशरामभाऊ पटवर्धन व अम्र
प्रवेश करितात.)

**नाना फडणीस**—तात्या, भाऊ, आज दोन वर्षे
प्रांतीं झालेला प्रजेचा छळ, पाळेगार लोकांची मानखंड
त्यांतून मुख्यत्वें नरगुंदकरांचा समूळ नाश या सर्व
पूच्या अनिवार कृत्यांस यथायोग्य शासन मिळालें;
बद्दल आपली आणि आपल्या सरदारांची तारीफ श्र
सवाईस बहुत पसंत झाली असून, मीही आपल्या स
आभारी आहें. या संबंधानें पुण्यास परत गेल्यावर ज
त्यांचे योग्यतेनुरूप सन्मान होईलच.

**हरिपंत फडके**—श्रीमंत सवाई यांची पुण्यप्र
तशी आहे. मग यश येणें यांत काय आश्चर्य?

**परशरामभाऊ**—त्या पुण्याईच्या प्रतापानें तर
वारीस हात घालून) ही तरवार रणांत गाजणार!

**नाना फडणीस**—पाहा, या चैत्रमासाच्या व
उन्हाळ्यांत या डोंगराळ आणि वाळुमय प्रदेशामध्यें
लढाई बरेच दिवस लांबल्यानें तुह्मां सर्वांस बहुत
झाले आहेत.

**परशरामभाऊ**—नाना, अशा कामांत आह्मी
मानीत गेल्यास (तरवारीस हात घालून) या तलवारीस
चढणार नाहीं काय?

**नाना फडणीस**—सत्य आहे. हें भाषण आपल्या सारख्या शूरासच योग्य ! परंतु या बदामीचे लढाईंत शें-पन्नास पालखीपदस्थ सरदार व हजारों शिपाई गारत झाले हें पाहून बहुत दिलगिरी वाटते !

**परशरामभाऊ**—नाना, यांत दिलगिरी दर्शविण्याचें बिलकुल कारण नाहीं. कारण, अनंत पुण्यकर्मै करून संपादिलेलें फळ स्वर्गप्राप्तीपेक्षां कांहीं विशेष नाहीं. परंतु पाहा, स्वामिकार्यांत धारातीर्थी जे अंत पावतात ते स्वर्गापेक्षांही पलीकडे असणारें जें सूर्यमंडल त्यास भेदून नारायणस्वरूप होतात अशी शास्त्रोक्ति आहे. अशा फळाची इच्छा आह्मी सुद्धां करूं, परंतु तें समयीं प्राप्त होण्यास पूर्वसुकृत पाहिजे ना ?

**नाना फडणीस**—भाऊ, असे जिवावर उदार होत्साते आपण भीष्मासारखे वीर दक्षिण दिशेस शत्रूच्या छातीवर आहांत, ह्मणूनच पेशव्यांच्या रियासतीचे दक्षिण दरवाज्यांत पाय ठेवण्याची कोणाची मगदूर नाहीं.

**परशरामभाऊ**—ही मुख्य या गादीची पुण्याई ! आह्मांकडे काय आहे ?

**हरिपंत फडके**—शत्रूस बदामीसारख्या बळकट किल्ल्याचा आश्रय मिळाल्यामुळें जरा अवधी लागली. नाहींपेक्षां केव्हांच फडशा पाडला असता.

**परशरामभाऊ**—जेथपर्यंत किल्ल्याचा मारा समजला नव्हता तेथपर्यंत जरा अवघड झालें होतें. पण जेव्हां महाकोटेश्वराकडील बाजूस डोंगरावर तोफा चढवून ठोक दिला, तेव्हां हातोहात काम फत्ते झालें.

( इतक्यांत बदरी जमालखा आल्याची वर्दी देतात. )

**नाना फडणीस**—काय हो तात्या? ठरल्याप्रमाणें तहनामा घेऊन बदरी जमालखा आला असावा असें वाटतें.

**हरिपंत फडके**—होय; तसेंच दिसतें.

( बदरी जमालखा प्रवेश करतो व परस्पर सलाम व ताजीम झाल्यावर सर्व खालीं बसतात. )

**बदरी जमालखा**—( नानांस अनुलक्षून ) आपका फरमाना बंदगाने आली टिपुसुलतान बहादूरको सब पसंत होके तहनामा तस्दीक करके भेज दिया है. पेशवा सरकारका और निजाम अल्लीका लियेसो मुलुक और किलेकोट आपके अमलदारोंके सुपुर्द करनेके लिये हमारे अमीन लोगोंको ताकीदभी दी है. और नजरानेके लिये जो रक्कम इकरार हो चुकी है, ओ पैसाभी जल्द पोहोंचेगा. ( तहनामा नानांचे हातीं देतो. )

**नाना फडणीस**—( तहनामा वाचून ) ठीक आहे, आमच्या ह्मणण्यास अनुसरून सर्व अटी कबूल झाल्या आहेत. आतां इतकेंच कीं, खां साहेब, आपल्या मध्यस्थीनें हा तह ठरला आहे तर तहनाम्याअन्वयें सर्व गोष्टी निदर्शनास येऊन आपले धनी टिपूसाहेब आणि आमचे सरकार यांचे दरम्यान दोस्ती निरंतर कायम राहावी अशी आमची इच्छा आहे.

**बदरी जमालखा**—हमारे सरकारकाभी इरादा येही है.

**नाना फडणीस**—नरगुंदकर संस्थानिकांस त्यांचे बरोबरील मंडळीसहित रास्ते यांजकडे आणून गुदरण्याच्या

संबंधानें आपल्यास पूर्वींच सुचविलें होतें त्याबद्दल काय तजवीज केली ?

**बदरी जमालखा**—जी, कावलेदुर्ग किलेमे नरगुंद-वालेको रखा है. उधरसे उनको बडी इजतसे लाकर, रास्त्योंकी तरफ पोहोंचा देनेके लिये तजवीज हुई है. चंद्रोजमे वे आवेंगे.

**नाना फडणीस**—फार उत्तम.

**बदरी जमालखा**—मै अब रजा लेता हुं.

**नाना फडणीस**—ठीक आहे. (विडे देतात. बदरी जमालखा जातो.) कां अमृतराव, आतां लवकरच तुमचे यजमान येतील.

**अमृतराव**—(हात जोडून) मुख्य आपली कृपा !

**नाना फडणीस**—(सर्वांस अनुलक्षून) ज्यांकरितां आलों होतों तीं कामें बहुतेक आटोपलीं. आतां निजामअल्लीशीं तेवढें बोलणें राहिलें आहे. निजामअल्लीनें या टिपूचे राजकारणांत "वैऱ्याचा वैरी सहज मित्र" या न्यायानें आमच्याशीं स्नेह केला, नाहींपेक्षां त्यांत कांहीं तथ्यांश नाहीं. तेव्हां मोंगलाई सरहद्दीवर गजेंद्रगडावर विशेष बंदोबस्त राखण्याकरितां, टिपूनें निजामाचा जो प्रांत बळकाविला होता तो निजामास परत दिला आहे त्यापैकीं गजेंद्रगड किल्ल्याचे बेगमीस कांहीं जास्त सरंजाम निजामअल्लीकडून घेण्याचें ठरवून लवकरच पुण्याकडे चालतें व्हावें.

**हरिपंत फडके**—खरोखर हेंही काम महत्वाचेंच आहे.

**अमृतराव**—(नानांस अनुलक्षून) माझी एक विनंति आहे.

**नाना फडणीस**—ती काय अमृतराव ?

**अमृतराव**—सरकार, बरेच दिवस दुष्ट यवनांचे

सहवासामुळें मनास खंती उत्पन्न झाली आहे. याकरितां आमचे धनी येईपर्यंत निरोप झाल्यास तीर्थयात्रा करून यावें ह्मणतों.

**नाना फडणीस**—ठीक आहे.

( कचेरी बरखास्त होऊन सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

### स्थळ—रेणुकास्थान.

( अमृतराव प्रवेश करितो. )

**अमृतराव**—( आपल्याशींच ) मला पेशव्यांची फौज सोडून आज दीड महिना झाला. धनी व्यंकटरावसाहेब बनशंकरी मुक्कामीं रास्त्यांकडे येऊन दाखल झाल्याची बातमी काल कळली तेव्हांपासून जीव निश्चिंत झाला. त्यांच्या भेटीस गेल्यास ते, माझें आज दुसरें जें एक कर्तव्य आहे तें करण्यास, मला जाऊं देणार नाहींत; ह्मणून परभारेंच चालतें व्हावें हें बरें. मुख्य स्वामिकार्य माझ्या हातून होणें जेवढें शक्य होतें तेवढें पुरें केलेंच. आतां स्वतःचें तेवढें राहिलें आहे. माझ्या जिवाचा जीव, प्राणाचा प्राण, अशी जी माझी प्रिया ती कोठें असावी बरें? सय्यद बुऱ्हानुद्दिन याच्या प्रतिबंधांतून ती साळूसमवेत निसटून पार झाल्यापर्यंत बातमी मिळते; त्यापुढें तिचा मागमूस सुद्धां लागत नाहीं. नांदणीस आईसाहेबांकडे ती गेली नाहीं हा शोध तर लागलाच. याशिवाय तिला या दुनियेंत राहण्यास दुसरी जागा नाहीं. मला वाटतें माझ्या मरणाची खबर ऐकून तिनें आपला प्राणत्याग केला असावा, किंवा दुःखातिशयामुळें भ्रमिष्ट होऊन देशांतरावर ती भ्रमण करीत असावी, अथवा, आपल्या प्रियजनांबद्दल

निराश होऊन विरक्त होत्साती तीर्थयात्रा करीत ती हिंडत असावी. यांपैकीं निःसंशय कांहींतरी एक असलेंच पाहिजे; यास्तव आपणही बैरागी व्हावें, आणि तीर्थाटन करीत हिंडून आपल्या प्राणवल्लभेचा शोध काढावा. शोध लागल्यास काम झालें; नाहींपेक्षां बैरागी तर बनलोंच आहें, देहदंडन करून परमार्थ साधावा. कारण, अशा सुंदर आणि सुशील स्त्रीविरहित आपला संसार व्यर्थ, जिणें व्यर्थ, संपत्ति व्यर्थ, ऐश्वर्य व्यर्थ, किंबहुना या जगांतील संसारसंबंधीं जीं जीं ह्मणून सुखें आहेत तीं सर्व व्यर्थ होत! याकरितां आतां हा आंगावरील पोषाक फेकून द्यावा, (कपडे काढून फेकतो.) आणि हा तुंबा, ही कफनी, व ही राख यांचाच आश्रय करावा! (आंगास राख लावून तुंबा व सोटा हातीं घेऊन) अहल्लक! गुरुनारायण! (असें ह्मणत ह्मणत निघून चालता होतो.)

---

## प्रवेश तिसरा.

### स्थळ—तुळजापुर गांवाबाहेरील रस्ता.

(ब्राह्मण व भोपे प्रवेश करितात.)

**एक ब्राह्मण**—कसें काय शामभट? तुमची तर बुवा चंगळ आहे. तुमचे काल आलेले संस्थानिक भोग, महाभिषेक, अलंकारपूजा कधीं करविणार?

**शामभट**—तुला रे कां पंचाईत?

**भोपे**—उद्यांचा बेत दिसतो. अलंकारपूजेंत तुमचं काय आहे?

**एक ब्राह्मण**—अभिषेक तर खरा ना? शामभटजी, अभिषेकास आमचा एक असामी घ्याल का?

**शामभट**—पाहा गुलाम आज कसा विचारतो! परवां त्या सोलापूरच्या बाबाजीनाईक चिवट्यांनीं शतचंडीचें अनुष्ठान करविलें तेव्हां आमची आठवण तरी तुला झाली होती का ?

**एक ब्राह्मण**—बरं बुवा; तें पाहा, कोण येत आहे. डोलीबिली सरंजाम दिसतो, यात्रेकरू तर खरेच !

(सर्व एकापुढें एक यात्रेकऱ्याकडे धांवूं लागतात.)

**ब्राह्मण व भोपे**—(यात्रेकऱ्यास) महाराज, कोठून आलांत ? आपलें नांव काय ? आडनांव काय ? उपाध्ये कोण ? भोपे कोण ?

**यात्रेकरू गृहस्थ**—अहो, एक एक बोलाल तर उत्तर मिळेल. गडबड करूं नका. आमचें नांव तुळाजीराव बाबा माने. आह्मी नागपूरचे राहणारे.

(ब्राह्मण व भोपे चोपड्या काढितात.)

**एक ब्राह्मण**—विठोजीराव माने आपले कोण ?

**दुसरा ब्राह्मण**—बापूसाहेब माने आपले कोण ?

**भोपे**—रहिमतपूरकर माने आपले भाऊबंद ना ?

**गृहस्थ**—असा गोंधळ करूं लागाल तर आह्मी एथें कांहींच सांगणार नाहीं. गांवांत बिऱ्हाडीं उतरूं तेथें या.

**एक भोप्या**—चला महाराज, आह्मी आपल्यास उतरण्यास उत्तम जागा देतों; आपण माने तेव्हां आमचे यजमानच. दाखला काढून दाखवितों हवा तर.

**दुसरा भोप्या**—आमचेही यजमान माने आहेत. शंभर वर्षांचा दाखला काढून दाखवितों, पाहावा महाराज. आमच्या घरीं चलावं महाराज, नामी जागा आहे.

**सर्व ब्राह्मण**—महाभिषेक, शतचंडी वगैरे करविण्याचा विचार आहे ना, महाराज?

**गृहस्थ**—जें काय बोलायचें तें आह्मी बिऱ्हाडीं बोलूं.

**सर्व भोपे**—ह्या बाई कोण?

**गृहस्थ**—ही आमची मुलगी.

**ब्राह्मण** व **भोपे**—ह्या आपल्या चाकरमाणसांचीं नांवें काय?

**गृहस्थ**—मी तुह्मांस साफ सांगतों कीं, मी एथें कांहींच उत्तर देत नाहीं; बिऱ्हाडीं या.

**सर्व**—ठीक आहे महाराज, गांवांत चलावें.

**साळू**—जिथं जावं तिथं हीं दोड मेलीं अशींच पाठशीं लागत्याती.

**चंपा**—अग, क्षेत्राच्या ठिकाणीं असं असायचंच.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश चवथा.

### स्थळ—सदर.

( बैरागयाच्या वेषानें अमृतराव प्रवेश करितो. )

**अमृतराव**—( आपल्याशींच ) द्वारका, अयोध्या, मथुरा, प्रयाग, गया, काशी, बद्रिकेदार, गोकुलवृंदावन अशीं पश्चिम आणि उत्तर तीर्थें व क्षेत्रें आज दोन वर्षें हिंडून पाहिलीं. तथापि, माझ्या प्राणवल्लभेचा कोठेंच थांग लागत नाहीं यावरून बहुतेक तर निराशा झालीच आहे. आतां श्रीभवानी हें आमचें कुलदैवत, याकरितां या तुळजापुरीं चार दिवस राहून नंतर श्रीशैल्यास जावें, व पुढें तसाच रामेश्वराचा रस्ता धरावा आणि वाटेंतील लहानसान

क्षेत्रेंसुद्धां हिंडून पाहावीं. याप्रमाणें दक्षिण व पूर्व समुद्रापर्यंत सर्व क्षेत्रें व शहरें हिंडूनही शोध न लागेल तर, पुनरपि नेपाळाकडे जाऊन बैराग्यांचे मेळांत शिरून राहिलेले आयुष्याचे दिवस घालवावे.

( अमृतराव जातो. )

---

## प्रवेश पांचवा.

**स्थळ**—तुळजापूर एथील श्रीभवानीचें देवालय.

( चंपा व साळू प्रवेश करितात. )

**चंपा**—अग साळू, तिकडे कुणीकडे चाललीस ? काल बाबांनीं नाहीं का सांगितलं, आधीं कल्लोळ तीर्थांत स्नान करून मग गायमुखाखालीं आंग धुवायचं ह्मणून ?

**साळू**—मी समजलें आदुगर गायमुखाखालीं आंगूळ कराया होवी ह्मणून शानी.

**चंपा**—तुझं आपलं आहेच पूर्व ह्मटली कीं पश्चिम समजायची. चल आतां गमूं नकोस, बाबा येतील इतक्यांत.

( दोघी जातात. )

---

## प्रवेश सहावा.

**स्थळ**—सदर.

( चंपा व साळू आंग धुऊन प्रवेश करितात. )

**चंपा**—आंग तर धुतलंच. चल आतां, सभामंडपामधून देवीकडे जाऊं.

**साळू**—( इकडे तिकडे पाहत ) हें बगीतला का ताईसाब ?

**चंपा**—अग, इकडे तिकडे अचरटासारखी बघूं न-

कोस. हुशारीनं चल. (हळूच) आहे का ग तुझ्या ल-क्षांत, साळू?

**साळू**—तें काय ताईसाब?

**चंपा**—अग, आपण आपल्या वि-हाडांतून येऊं लागलों असतां बाजारांत (अमृतरावाकडे बोट करून) हा बैरागी आपल्यास भेटला.

**साळू**—खेत्राच्या ठिकाणीं बावा बैरागी समदं यायचंच, ताईसाब.

**चंपा**—अग, तसं नव्हे! तिथून येत असतां आह्मी फुलांच्या माळा, फळफळावळ, हळदकुंकवाच्या पुड्या, नाडापुडी, नारळ, वगैरे सामान घेण्याकरतां जिथं जिथं उभ्या राहूं, तिथं तिथं आमच्यामागें, पाहा, हा बैरागी उभाच राही! तूं नसशील कदाचित् नीट पाहिलंस, कारण, तूं हें सगळं सामान घेण्याच्या नादांत होतीस.

**साळू**—जरी, ताईसाब, मी हे समदं घेत होतें, तरी बगा, हीं शहरचीं माणसं तुमच्या आंगावरून जातील ह्मणुनशानी, माझी नजर चौकड हैच. हा तुमता उभा राहून कुठं राही मेला? आह्मी पुढं गेलों कीं, आमच्या मागून येऊन पुढं जाई, आन् फिरून मागं येई. अशा येरझारा करी. इतकंच नाहीं, ताईसाब, जवळून जाऊं लागला कीं अक्षी आपनासनी न्याहाळून पाही गुलाम! आतां तरी बगा कीं, तिकड उभा राहून कशी इकड नजर लावलिया! घटिंगण मेला!

**चंपा**—होय ग साळू, मला तर बाइ बब, भय वाटतं! अग, हा वेडाबिडा तर नसेल ना?

**साळू**—हे बैरागी किनई, ताईसाब, अशीं भांगच

वोट पियाच, गांजा फुकायच, अफू खायाची आन् सदा बगा धुंदीमंदींच राह्याच ! वेड नाहीं तर काय ? तेला का शिंगं असत्याती ?

**चंपा**—( चालत असतां थबकून हळू शब्दानें ) बाई साळू, पाहिलंस का तो कसा इकडे पाहूं लागला आहे ? आणि आपल्या आंगावरच येतो कीं काय अशा तयारीनें राहिलेला दिसतो ! ह्मणून ह्मणतें, आपण अशा बाजूस उभ्या राहूं. जाऊं दे मेला कोणीकडे जात असेल तो. ( बाजूस उभ्या राहतात. )

**साळू**—( बैराग्यास उद्देशून ) इतका कां टवकारून बघतोस मेल्या ? डोळ फाटतील कीं !

**चंपा**—अग, हळू बोल.

**साळू**—हळूच बोलतेया कीं, ताईसाब, आन् त्या दोडाला आमची बोली कुठं समजतिया ?

( चंपा व साळू उभ्या असतां दोघींमधून अमृतराव देवळांत जातो. )

**चंपा**—( भ्याल्यासारखें करून ) अग बाई ! आतां ग बाई काय करूं ?

**साळू**—( आपल्या जागींच ) मेल्या, आंगाला राख फासून बैरागी होऊनशानी बी, बायकांच्या आंगावरून जातुस का ? पुन्हा ये तर दोडा, ह्मंजे देतें एक चांगली थोबाडींत !

**चंपा**—बाई साळू, माझे हातपाय थरथरूं लागले आहेत व काळीज कांपूं लागलें आहे ! बाबा आल्याशिवाय आतां मी ह्मणून देवीपुढं जायची नाहीं.

**साळू**—( बाहेर पटांगणाकडे पाहून ) ते बगा, ताईसाब, इठ्ठला बरूबर घेऊनशानी बाबा बी आलच.

( तुळाजीराव बाबा चाकरासहित प्रवेश करतात. )

**तुळाजीराव**—( दोघींजवळ येऊन ) आंत नाहीं का ग गेलां ?

**चंपा**—बाबा, तुमची वाट पाहत उभ्या आहोंत.

**तुळाजीराव**—बया, मीं भोप्याला सांगून ठेवलें होतें आधीं तुझ्याकडून पूजा करवावी ह्मणून. बरें, आतां चल लवकर, आपण आपलें काम आटपून घेऊं; कारण, आज कोणी पुण्याकडील संस्थानिक महाभिषेक करविणार आहेत.

( सर्व गर्भालयांत जातात. )

**अमृतराव**—( सभामंडपांत देवीकडे लक्ष लावून मनांत ) काय चमत्कार हा ! ! मला वाटतें जगदंबेनें मजवर खचीतच कृपा केली. काय ? ही स्त्री कोण असावी बरें ? रूप तेंच, भाषण तेंच; मात्र तोंडावर पांढुरकी आली आहे, डोळे निस्तेज दिसताहेत, व अत्यंत कृशता आली आहे. शिवाय, पांढरीं वस्त्रें परिधान केल्यामुळें, व केशकलाप अस्ताव्यस्त असल्यामुळें, ही केवळ विरक्त दिसत आहे. एवढाच काय तो फरक, बाकी सर्व जुळतें !

**चंपा**—बाबा, माझी पूजा आटपत आली, ओटी भरून आरती ओंवाळतें ह्मणजे झालं.

**अमृतराव**—( आपल्याशींच ) हा ह्मातारा कोण असावा बरें ? ती याला बाबा ह्मणते. तिला बाप ना चुलता असें असून हे बाबाचें लचांड कोठून आलें ? कदाचित् माझीच चूक असेल ! कारण, बायकांसारख्या बायका दुनयेंत पुष्कळ असतात. तेव्हां एखाद्या परक्या स्त्रीस हीच माझी बायको ह्मणून वेडेचार करूं लागेन तर,

पापसाधन एकीकडेच राहूं द्या, परंतु तूर्त आंगभर मार मात्र खावा लागेल !

**चंपा**—साळू, तें ओटीचं सामान इकडे घे आणि आरती लावून दे.

**साळू**—हिंग, ताईसाब.

**अमृतराव**—(आपल्याशींच) माझ्या प्रियेच्या कुळंबिणीचें नांव साळू, आणि हिच्या कुळंबिणीचेंही पण तेंच नांव. या साळूच्या रूपांत कांहींच बदल दिसत नाहीं. मात्र कपाळावर एक वण दिसतो. सटवी कुठें पडली बिडली तर नसेल ? आणि जें नांव माझ्या प्रियेची कुळंबीण आपल्या धनिणीचें घेत असे तेंच ही घेते. या एकंदरीवरून हीच माझी प्रिया होय ! होय ! हीच ! हीच !

(चंपा हात जोडून ध्यानस्थ उभी असतां डोळ्यांतून अश्रु वाहूं लागतात.)

**तुळाजीराव**—बये, चंपाताई, काळजी करूं नको. जगदंबा खचीत तुझें मनोगत पूर्ण करून, तुझी व तुझ्या पतीची गांठ घालील. तुला वाटेल तो नवस तूं आपल्या श्रीकुलस्वामिणीस कर. तो मी फेडण्यास तयार आहें.

**अमृतराव**—(आपल्याशींच) आतां मात्र एकूणएक शंकेचें निवारण श्रीजगदंबेनें केलें. (मोठ्यानें) अंबे, त्रिपुरसुंदरी, आदिशक्तिस्वरूपिणी भवानी, माझ्या प्राणवल्लभेकरितां आजपर्यंत मीं पुष्कळ क्षेत्रें, देवस्थानें हिंडून तिचा शोध केला, परंतु एक देव सुद्धां माझ्या नवसास पावला नाहीं. असें असून, देवी, तूं माझें कुलदैवत ह्मणून माझी कुलवृद्धि व्हावी, मीं हा वैताग टाकून देऊन पुन्हा प्रपंच धरावा, एतदर्थ ह्मणा, किंवा दुरित निवारण करणारी तूं

महादुर्गा ह्मणून प्रियजनवियोगजन्य दुःखरूपी डोहांत मी बुडालों असतां त्या संकटांतून मला मुक्त करण्याकरितां ह्मणून ह्मणा, जो तूं आपल्या गळ्यांत प्रचंड मुक्ताहार धारण केला आहेस, त्या हारांतून हें अमोल्य मुक्ताफळ, माझ्या पदरीं घालण्याच्या तयारीनें घे घे ह्मणत आपला वरदहस्त पुढें करीत आहेस असा या समयीं मला खचित भास होत आहे! तर देवी कुलस्वामिणी, हें प्रासादिक फळ, तुझ्या आज्ञेनें हा पाहा मी तुझा भक्त घेतों! जय काली! जय भवानी! (असें ह्मणून ध्यानस्थ उभी असलेल्या चंपास उचलून नेतो. ती, बाबा, बाबा, ह्मणून ओरडते.)

**तुळाजीराव**—अरे काय अनर्थ हा! धरा! धरा! विठ्या, पाहतोस काय? धर त्या बैराग्याला; तो माझ्या बाळेला घेऊन चालला! अरे, धरा धरा! (देवळाचे प्राकारांत समोरून शिपाई व मंडळी येत असलेली पाहून, भोपे व ब्राह्मण यां सर्वांसह) अहो धरा त्या बैराग्याला. मुलीला नेत आहे त्याला आडवा. (असें ह्मणत ते सर्व पाठीस लागून देवालयाचे पटांगणांत बैराग्यास धरतात.)

(व्यंकटरावसाहेब शिपाईप्याद्यांसह प्रवेश करितात.)

**व्यंकटरावसाहेब**—(त्या मंडळींत बैराग्याजवळ येऊन) अरे ए बैराग्या, हरामखोरा, हें काय अनुचित कर्म करीत आहेस? अरे, त्या मुलीला तूं कोठें नेतोस?

**अमृतराव**—(व्यंकटरावसाहेबांस ओळखून) आज जगदंबेनें मजवर सर्वोपरी कृपा केली! (चंपास खालीं ठेवतो व व्यंकटरावसाहेबांचे पायांवर डोकें ठेवून पायांस मिठी मारतो.)

**व्यंकटरावसाहेब**—(साश्चर्य) अरे, हा बैरागी नव्हे, याचें भाषण आपल्या अमृतरावासारखें आहे.

**अमृतराव**—होय महाराज, मी आपल्या पायांचा सेवक खरोखरच अमृतराव आहें.

**चंपा**—दादा, दादा,—(असें म्हणत व्यंकटरावसाहेबांचे गळ्यास मिठी घालून रडूं लागते.)

**व्यंकटरावसाहेब**—बाळे, रडूं नकोस. काय चमत्कार हा! कोण आश्चर्य! ज्यांच्याकरितां आपण रात्रंदिवस काळजी करीत होतों, त्यांच्या गांठी अशा अकस्मात् पडाव्या आणि त्या या जगदंबेचे संनिध! शाबास! हीच अघटित घटना खरी! आणि हीच परमेश्वराची अगाध लीला ह्मणावी! जगज्जननी, कोण तुझी कृपा ही! (चंपाचे डोळे शेल्याच्या पदरानें पुसून) बाळे, रडूं नकोस. (आपल्या मंडळीस अनुलक्षून) चला, आपण आंतल्या सभामंडपांत जाऊन बोलूं.

(व्यंकटरावसाहेब, अमृतराव, चंपा वगैरे मंडळी सभामंडपांत जातात व तेथें बसून एकमेकांचें क्षेमकुशल विचारतात.)

**अमृतराव**—(व्यंकटरावसाहेबांस) महाराज, आपण इकडे कसे आलां हें ऐकण्याची मला फार उत्कंठा लागली आहे.

**व्यंकटरावसाहेब**—अमृतराव, बदामीची लढाई झाल्यावर श्रीमंतांनीं, आह्मांस रास्त्यांकडे आणून सोपवावें असा टिपूकडून करार करून घेतला होता.

**अमृतराव**—होय महाराज, तेथपर्यंत मी श्रीमंतांचे लष्कराबरोबरच होतों.

**व्यंकटरावसाहेब**—त्याप्रमाणें आह्मी सुटून रास्त्यांकडे आल्यावर प्रथम **नांदणीस** जाऊन सर्व मंडळीस घेऊन पुण्यास गेलों.

**चंपा**—दादा, माझ्या आईसाहेब, वहिनी, व माझा भाचा आपासाहेब, हीं सर्व खुशाल आहेत ना ?

**व्यंकटरावसाहेब**—( चंपाचें पाठीवर हात फिरवून ) बये, तुझा भाचा आपासाहेब वगैरे सर्व खुशाल आहेत बरें. अमृतराव, पुण्यास आल्यावर नाना फडणिसांकडे संस्थानच्या संबंधानें परशरामपंत भाऊ पटवर्धन यांच्या मध्यस्थीनें बोलणें चालविलें होतें. परंतु, मध्येंच भाऊंस कांहीं निकडीचें काम आल्यामुळें ते तासगांवास निघून गेले. ते परत येईपर्यंत पुण्यास स्वस्थ बसून राहण्यापेक्षां, तुळजा भवानीचे दर्शनास जावें असें मनांत आल्यावरून इकडे आलों. एथून जोगाईचे दर्शनाकरितां आंब्यास जाण्याचा विचार आहे. तुह्मी महायात्रेस गेल्याचें नानांनीं कळविलें; परंतु गेल्या तागाईत तुमच्याकडील वर्तमान नाहीं. तेव्हां तुमच्या शोधाकरितां, तसेंच चंपाची अवस्था काय झाली हें कांहींच कळेना ह्मणून तिच्या शोधाकरितां, चहूंकडे माणसें पाठविलीं असतां आजपर्यंत तुह्मां दोघांचाही कोठेंच थांग न लागल्यामुळें आह्मी सर्व बहुत चिंतेंत होतों. परंतु भगवल्लीला कशी आहे पाहा ! जसें इच्छिल्यावांचून संकट प्राप्त झालें तसेंच नकळत सुखही प्राप्त होत चाललें ! मनुष्यानें मुख्य आपली नियत चांगली राखावी, ह्मणजे परमेश्वर खचित त्याची उपेक्षा करीत नाहीं.

**अमृतराव**—खरें आहे महाराज. बरें पण, आपले काळोपंत आप्पा कोठें आहेत ?

**व्यंकटरावसाहेब**—बाबारे, काय सांगूं ? तुह्मां सर्वांस त्या दुष्टांनीं मारून टाकण्याचा हुकूम केल्यानंतर थो-

ड्याच कालांत एकाएकीं आप्पांस आह्मांपासून नेऊन त्यांचे हाल हाल करून त्यांचा त्यांनीं प्राण घेतला! ( डोळ्यांतून पाणी येतें. )

**अमृतराव**—हाय, हाय! आप्पांसारखा धारिष्टवान्, स्वामिकार्यनिष्ठ, आणि निश्चयी पुरुष या दुनयेंत मिळणें विरळा. राम! राम! फार अनुचित गोष्ट झाली. आमच्यासारखे हजार जाऊन एक आप्पा वांचायाचे होते.

**व्यंकटरावसाहेब**—बाबारे, तुह्मी सर्वच मला जिवापाड प्रिय आहांत! अमृतराव, तुह्मी महत्संकटांतून जीव वांचवून श्रीरंगपट्टणाहून पार होऊन आलां, तो वृत्तांत नाना व भाऊ यांच्या मुखें मीं सर्व ऐकिला. व्यंकटपतीनें तुह्मां सर्वांस पुनर्जन्म दिला यांत कांहीं संशय नाहीं. ( तुळाजीराव व्यंकटरावसाहेबांपुढें येऊन त्यांच्या पायां पडतो त्यांना पाहून ) हे गृहस्थ कोण आहेत ?

**चंपा**—दादा, यांनींच माझा जीव वांचविला आणि आज दोनवर्षे पोटच्या लेंकराप्रमाणें यांनीं माझं पालन केलं. हे नागपूरकर भोसल्यांचे पदरीं मोठे मानकरी आहेत. यांचं नांव तुळाजीराव बाबा माने.

**व्यंकटरावसाहेब**—अहो, तुमची आणि हिची कशी गांठ पडली ?

**तुळाजीराव**—महाराज, मनास एका प्रकारची उदासीनता उत्पन्न होऊन आज दहा वर्षे यात्रा तीर्थे करीत हिंडत आहें. रामेश्वरयात्रा संपादून परत येत असतां, एके दिवशीं श्रीरंगपट्टणाजवळ पश्चिमवाहिनी कावेरीनदीच्या तटाकीं धर्मशाळेंत मुक्काम करून दुसरे दिवशीं पहांटच्या समयास मार्गस्थ झालों असतां, श्रीरंगपट्टण गांवापुढील मैदा-

नांत ही आपली चंपाताई आणि ही तिची कुळंबीण साळू जखमा लागून बेशुद्ध पडलेल्या अकस्मात् दृष्टीस पडल्या. लगेच त्यांस आह्मीं आपल्याबरोबर डोलींत घेतल्या व त्या आजपर्यंत आह्मांबरोबरच आहेत.

**व्यंकटरावसाहेब**—तुळाजीराव, माझ्या बहिणीला आपण जीवदान दिलें, हे मी आपले अनंत उपकार समजतों. ( चंपास उद्देशून ) बये, सय्यद बुऱ्हानुद्दिन याच्या बंदींतून तूं मोठ्या युक्तीनें पार झालीस हा वृत्तांत मीं ऐकिला आहे. परंतु बाळे, पुढें तूं श्रीरंगपट्टणास कां गेलीस ?

**चंपा**—दादा, आपणां सर्वत्रांस पट्टणास नेल्याचं वर्तमान कळतांच मी तिकडे गेलें.

**व्यंकटरावसाहेब**—मग पुढें ?

**चंपा**—ज्या दिवशीं आह्मी तिथें जाऊन पोहोंचलों, त्याच दिवशीं संध्याकाळीं नदीतटाकीं आमच्या नरगुंदच्या माणसांस ठार मारणार हें ऐकल्यावर पहिल्यानं बरोबर शोध घेण्याकरितां मीं आमच्या या साळूस तिकडे पाठविलं.

**व्यंकटरावसाहेब**—अरेरे!! माझ्या पदरच्या माणसां-नीं त्या नीच यवनांचें काय केलें होतें बरें ? बिचारे माझे आ-ज्ञेस्तव आणि संस्थानच्या अभिमानाकरितां शत्रूशीं लढले. त्या दुष्टांच्या अनन्वित कृत्यांस उपाय नाहीं ! बरें मग ?

**चंपा**—तेथें आमच्या इतर नरगुंदकर मंडळीबरोबर (अमृतरावांकडे बोट करून) यांच्यावरही शत्रूनें गोळी घातली हें या साळूनं प्रत्यक्ष पाहिलं ! ( रडूं लागते. )

**व्यंकटरावसाहेब**—बाळे, आतां रडूं नकोस. ( तिचे डोळे पुसतो. ) अग, जिथें जगदंबा वांचविणार समर्थ तिथें तुझ्या नवऱ्याचा जीव घेणार कोण ? पुढें काय झालें ?

**चंपा**—दादा, त्याच रात्रीं त्या भयंकर स्मशानांत आह्मी वेष पालटून गेलों व प्रियाबरोबर नदींत सहगमन करावं या हेतूनं आह्मी दोघी प्रेतं हुडकूं लागलों. त्यांत आह्मीं (अमृतरावांकडे पाहून) यांस ओळखिलं, इतक्यांत आह्मांस ढकलून देऊन हे पळूं लागले, व आह्मी यांच्या पाठीस लागलों.

**व्यंकटरावसाहेब**—चंपा, तूं आपल्या सावलीस भिणारी; अशी तूं भित्री असतां, अग, तशा भयंकर स्मशानांत तूं कशी गेलीस? अमृतराव, पाहिलें? मनुष्य जिवावर उदार झालें ह्मणजे त्यास देहभान राहत नाहीं ह्मणतात तें हें! (चंपाकडे) बये, पुढें काय झालें?

**चंपा**—यांची आह्मीं लगट केली आणि यांना धरिलं तेव्हां यांनीं आह्मांवर लाथाबुक्यांचा मार केला. नंतर काय झालं तें आह्मांस ठाऊक नाहीं. दुसरे दिवशीं (तुळाजीरावांकडे बोट करून) या बाबांच्याबरोबर आह्मी मार्गस्थ आहों असं समजलं.

**अमृतराव**—शिव शिव!! शत्रूकडील लोक असतील या भ्रांतीनें मजकडून हें अनुचित कर्म घडलें ना?

**व्यंकटरावसाहेब**—अमृतराव, तशा भयंकर प्रसंगीं देहभान कोठून राहणार? प्रज्ञा कोठून असणार? असा आकस्मिक प्रमाद घडल्यांत आश्चर्य नाहीं!

**अमृतराव**—अग, साळू, या तुझ्या कपाळावरील वणानें मला बराच वेळ घुटमळत पाडलें होतें. हा कशानें ग झाला?

**साळू**—आपुनच दोघींसनी, धराया गेलों ह्मणूनशानी, मारमारून पाडलं तवां दगडावर आपटून ही खोक पडली, आन् आतां कस अजानत्यावानी इचारत्यात बगा कीं?

**चंपा**—( हंसत ) अग, तुला ओळखलं असतं तर मारलं असतं का ? वेडीच मेली.

**साळू**—देवानं सगळं चांगलं केलं ह्मणून ताईसाहेबांसनी आतां हसूं येतया!

**व्यंकटरावसाहेब**—तुळाजीराव, तुमचे हे उपकार या जन्मीं माझ्या हातून फिटणें खरोखर अशक्य आहे. तथापि, तुह्मी या वेळेस जें सांगाल तें करण्यास मी तयार आहें.

**तुळाजीराव**—महाराज, दुसरें कांहीं माझें मागणें नाहीं. परमेश्वरानें इतर सर्व प्रकारें मला सुखी ठेवलें आहे. परंतु, एक संतति नसल्यानें माझी संपत्ति व माझें इतर ऐश्वर्य, हीं सर्व मला व्यर्थ वाटत आहेत. आतां, माझा वृद्धापकाळ झाला आहे. तर महाराज, माझ्या मागें माझ्या घराण्याचें नांव राहावें हें आपल्यास उचित वाटत असल्यास, (चंपाकडे बोट दाखवून) या सुशील साध्वीवर आज दोन वर्षें पोटच्या लेकरासारखा माझा प्रेमा जडलेला आहे, तेव्हां या बाईच्या पोटीं देवदयेनें पहिला मुलगा होईल त्यास माझ्या ओट्यांत घालीन असें वचन द्यावें. या खेरीज आपल्या पायांशीं माझें कांहींएक मागणें नाहीं.

( व्यंकटरावसाहेब, अमृतराव व चंपा यांकडे पाहूं लागतात. )

**अमृतराव** आणि **चंपा**—महाराज, आह्मांकडे पाहण्याचें कारण नाहीं. या देहांचे मालक दुसरें कोण आहे ?

**व्यंकटरावसाहेब**—तुळाजीराव, तुमच्या इच्छेप्रमाणें खचित होईल. हें माझें वचन अन्यथा होणार नाहीं. व्यंकटपतीच्या कृपेनें ( चंपाच्या पाठीवर हात फिरवून ) या माझ्या बयेस लवकरच मुलगा मात्र व्हावा !

**अमृतराव**—महाराज, आपला तो कृष्णाजीपंत कोठें आहे ?

**चंपा**—त्या मेल्या चांडाळाचं अशा आनंदाच्या वेळेस नांव सुद्धां घेऊं नका ! आग लागो त्या मेल्याच्या तोंडाला ! दुष्टानं मला एकापरी का छळलं आहे ! आठवण झाली कीं, आंगाची लाही होते !

**व्यंकटरावसाहेब**—अमृतराव, आमची सुटका करण्याकरितां कावलेदुर्ग किल्ल्यांतून शत्रूंनीं जेव्हां आह्मांस श्रीरंगपट्टणास आणिलें, तेव्हां तेथें मुकुंदरावांची गांठ पडली. त्यांच्या तोंडून, त्या मांग कृष्णाजीपंतानें आपल्या फायद्याकरितां चंपाचा केलेला छळ, तिला शत्रूच्या गोशांत घालण्याची त्याची खटपट, तसेंच आमचा नाश आणि शत्रूचा जय होण्याकरितां टिपूस व त्याच्या सरदारांस वेळोवेळीं दिलेली सल्लामसलत, शिवाय शेवटीं आह्मीं किल्ला सोडून जावें आणि आमचीं हत्यारें शत्रूंनीं हिरावून घ्यावीं याविषयीं तोरगलच्या काजीच्या मध्यस्थीनें केलेला कपटाचा उद्योग, खेरीज शत्रूपाशीं आमची परोपरीची निर्भर्त्सना, हा सर्व वृत्तांत ऐकून संतापानें आंगाची लाही झाली ! आणि—

**अमृतराव**—( आवेशानें ) महाराज, आज्ञा व्हावी, या घटकेस असाच, तो नीच असेल तेथें जाऊन, हरतऱ्हेनें त्याचें मुंडकें तोडून आणून या पायांपाशीं अर्पण करितों !

**व्यंकटरावसाहेब**—अमृतराव, पुढें ऐका. परमेश्वर ज्यांच्या त्यांच्या कृतीस अनुलक्षून जिथल्या तिथेंच न्याय दिल्यावांचून राहत नाहीं. पाहा, या आपल्या चंपाताईस त्या दुष्टानेंच सोडून दिली अशा प्रकारचा संशय त्या सय्यद

बुऱ्हानुद्दिनास येऊन त्यानें त्या कृष्णाजीपंताची नरगुंद शहरांत धिंड काढिली, इतकेंच नव्हे, तर त्याला बाटवून मुसलमानही केलें !

**अमृतराव**—महाराज, अशा लुब्ध्या आणि आप्पलपोट्या माणसाची अशी दशा होणें हेंच रास्त आहे.

**व्यंकटराव**—अमृतराव, पुढें ऐका—शिवाय मुकुंदराव असें सांगत होते कीं, या कृष्णाजीपंताची बायको आपली जिंदगी वगैरे सर्व घेऊन मोगलाईत आपल्या आप्तांकडे चालली असतां वाटेंत पेंढाऱ्यांनीं गांठून तिला आणि तिच्या मुलांमाणसांस मारून सर्व जिंदगी लुटून नेली. हें वर्तमान अगदीं आलीकडे ह्मणजे आह्मी सुटून इकडे येण्याचे आधीं सुमारें एक महिना पट्टणमुक्कामीं कृष्णाजीपंतास कळतांच तो द्रव्यलोभी सर्वस्व गमाविल्याची व आपलीं मुलेंमाणसें मेल्याची वार्ता ऐकून दुःखानें बिछाना धरून पडला व अगदीं मरणोन्मुख झाला. अशा प्रसंगींच बदामीचे लढाईत टिपूचा पराजय आणि आमची लौकरच सुटका होणार हेंही वर्तमान त्यास कळलें. तेव्हां त्यानें मुकुंदरावजींस मुद्दाम आपल्याजवळ बोलावून अशी हकीकत कळविली कीं—मी मूळ कायस्थ जातीचा, नांव कनयालाल, जन्म चांगल्या घराण्यांत झाला होता, परंतु दुर्वर्तनामुळें स्वदेशत्याग करून इकडील प्रदेशीं यावें लागलें वगैरे आपली जन्मापासून कुळकथा आणि आपस्वार्थाकरितां आपण काय काय दुष्कर्में केलीं तीं सर्व मोकळ्या मनानें सांगून अत्यंत दुःखविव्हळ झाला, आणि केल्या कर्माचा हल्लीं आपल्यास पूर्ण पश्चात्ताप झाला आहे तर, सर्वोपरी आपल्यास क्षमा करावी

अशाबद्दल आह्मांस विनंति करण्याविषयीं मुकुंदरावजींस हात जोडून प्रार्थना केली व त्या कनयालालनामधारी कृष्णाजीपंतानें प्राण सोडिला. हा सर्व वृत्तांत मुकुंदरावजींनीं सांगतांच तो ऐकून माझें मन फारच आश्चर्यचकित झालें; आणि त्याच्या स्वभावाबद्दल व कृत्यांबद्दल शेवटपर्यंत कोठेंही कोणास पत्ता लागला नाहीं याचें फारच नवल वाटून त्या धूर्तानें केलेल्या भ्रष्टाकाराच्यासंबंधानें मनास फार खंती वाटली. परंतु झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. आतां, केल्या कर्मांबद्दल परमेश्वरच त्या बिचाऱ्या कनयास क्षमा करो ! जें जें आमच्या प्राक्तनीं होतें तें तें आह्मीं सर्वांनीं भोगिलें हेंच खरें !

**चंपा**—दादा, चला आतां आपण लवकर बिऱ्हाडीं जाऊं. आई, वहिनी, व माझा भाचा, या सर्वांस केव्हां कडकडून भेटेन, व आईवहिनींच्या पायांला केव्हां मिठी मारीन, असं मला झालं आहे.

**व्यंकटरावसाहेब**—चला गर्भालयांत, प्रथम देवी श्रीभवानीचें दर्शन घेऊन नंतर बिऱ्हाडीं जाऊं.

( सर्व जातात. )



## ग्रंथकर्त्याची देवीस प्रार्थना.

**पद**—ताल झंपा. **चाल**—आतां रामपायीं मना लागीं वेगें.

॥ उदयोस्तु उदयोस्तु उदयोस्तु दुर्गे ॥

॥ विश्वतेजोमयी महाशक्ति सुभगे ॥ धृ० ॥

सृष्टिसंरक्षिके दैत्यसंहारिके सकलसुरनायके शैलतनये । अपरिमित संकटें पडति जेव्हां जगीं अवतरूनि त्यालागीं संहरसि गे ॥ उदयो० ॥ १ ॥ बिकट आवर्षणीं त्रस्त झाल्या जनां निर्मुनि तरुवना पोषियेलें । ख्याति अवनीवरी दावुनीही वरी नाम बनशंकरी पावसी गे ॥ उदयो० ॥ २ ॥ धर्म सांडोनियां कर्म भंडाविलें वेदशास्त्रादिकां त्यागियेलें । अभक्षा भक्षुनी सकल जन हे पाहा मत्त झाले महाम्लेच्छसंगें ॥ उदयो० ॥ ३ ॥ पापसंताप हा जाळितो मेदिनी हे कष्ट तव मनीं आण देवी । मेघवृष्टीपरी आर्यभूमीवरी धर्मसंस्थापना त्वरित करी गे ॥ उदयो० ॥ ४ ॥ राजराजेश्वरी देवि योगेश्वरी सकल सिद्धेश्वरी ब्रह्ममाये । रघुतनय बाळ मी शरण आलों तुला सदय होऊनि मला उद्धरी गे ॥ उदयो० ॥ ५ ॥

**समाप्त.**

